हें पुस्तक श्री जैन तत्त्वज्ञान विद्यापीठ-पुणें ह्या संस्थेनें आपल्या 'प्रारंभिक' परीक्षेसाठीं मंजूर केलें आहे.

# श्री नवजीवन ग्रंथमाला–सोपान : ५ (मराठी) :


आवृत्ति — पहिली · प्रती — १०००

वि. सं. २०११ (शके १८७७) इ. स. १९५५

किंमत दीड रुपाया









—: हें पुस्तक मिळण्याचीं ठिकाणें :—

श्री नवजीवन ग्रंथमाला, गारीआधार (सौराष्ट्र)

श्री जैन तत्त्वज्ञान विद्यापीठ

प्रधान कार्यालय — १४६–४७ रविवार पेठ, पुणें २.

बृहद् गुजरात शाखा
[illegible] पेठ,
बडोदें १.

सौराष्ट्र शाखा
[illegible] बाजार,
जामनगर.

 अनुक्रमणिका 

## पहिला विभाग — पृष्ठ १–१३४



## दुसरा विभाग — पृष्ठ १३५–२०७



## सुरवातीचीं पानें

# प्रकाशकाचें निवेदन

अलीकडे-अलीकडे आमच्या ग्रंथमालेकडून वैशिष्ट्यपूर्ण अभिनव टीकेच्या पुस्तकांचें प्रकाशन-कार्य चालू आहे. ह्या प्रयासांत हें पुस्तक म्हणजे मराठी भाषेंत जैन साहित्याचें एक रत्नच आहे जणूं ! रत्नदीपाप्रमाणें जनतेस हें पुस्तक उपयोगी होईल, आवश्यक वाटेल— असा आम्हांस दृढ विश्वास आहे. धार्मिक शिक्षण म्हणजे जीवनाचा पाया आहे, जीवनाच्या पायाचें शिक्षण आहे व तो पाया पक्का ( मजबूत ) करण्याचें शिक्षण अगदीं सोप्या पद्धतीनें ह्या पुस्तकांत देण्यांत आलें आहे; म्हणूनच हें पुस्तक जनतेस, खरोखर, आशीर्वादाप्रमाणें फायदेशीर होईल, असें आम्हांस आतां वाटूं लागलें आहे.

श्री जैन तत्त्वज्ञान विद्यापीठ-पुणें या संस्थेनें हें पुस्तक स्वतःच्या 'प्रारंभिक' परीक्षेसाठीं मंजूर केलें असल्यामुळें ह्या पुस्तकाचा सर्वत्र आदर होईल - हें पुस्तक सर्वमान्य होईल, अशी आम्हांस आशा आहे. शिवाय हें पुस्तक सर्वग्राह्य, विद्वद्भोग्य नि हृदयग्राही झालें आहे, ह्यामुळें आम्हांस आनंद होत आहे.

शुद्ध आणि सुंदर छापकामासाठीं शक्य ते सर्व प्रयत्न केले आहेत, तरीही 'हंसक्षीरन्याय' अंगीं घ्यावा अशी मी सर्वांस विनंति करतों.

श्री संघाच्या आशीर्वादानें अशीं अनेक प्रकाशनें प्रसिद्ध करून ज्ञानाची सेवा करण्याचें सौभाग्य सदैव प्राप्त व्हावें, अशी एकमात्र शासनदेवाजवळ हार्दिक नम्र प्रार्थना ( याचना ) !

| | | |
|---|---|---|
| मार्गआधार ( सौराष्ट्र ).<br>ता. १-२-१९५५. | } | व्यवस्थापक,<br>श्री नवजीवन ग्रंथमाला |

 # आमचें हृद्गत 

आमचें हृदय ज्याच्यासाठीं उचंबळून येत असें, आमच्या हृदयांत ज्याच्यासाठीं आनंदाच्या ऊर्मि उसळत असत, त्या "प्रारंभिक पाठ्यक्रमा"चें उत्तम प्रकारें संपादन करून त्यास श्री चतुर्विध संघाच्या करकमलीं अर्पण करतांना आम्हांस एक अनिर्वचनीय (ज्याचें शब्दांत वर्णनच होऊं शकत नाहीं अशा) सुखाचा-आनंदाचा अनुभव होत आहे. श्री जैन सिद्धांतांत **षडावश्यकांना** प्रामुख्यानें विरतिसाधक (वैराग्य उत्पन्न करणारीं) मानण्यांत आलें असून त्यांचें अगदीं विस्तृत विवेचन श्री आवश्यक सूत्रांत आहे. प्रत्येक जैनास ह्यांची संपूर्ण माहिती असणें अगदीं आवश्यक आहे. ज्याप्रमाणें टपाल खात्याची कार्य-पद्धति (Post System) रेल्वे (आगगाडी), स्टीमर (मोठें जहाज, गलबत) किंवा एरोप्लेन (विमान) यांच्याशीं संबद्ध असते, त्याचप्रमाणें ह्या सहा आवश्यकांचा प्रतिक्रमण सूत्रांशीं अगदीं जवळचा संबंध आहे. श्री आवश्यक सूत्रें ही सुट्या (मोकळ्या) सुवासिक फुलांप्रमाणें असून त्यांना प्रतिक्रमणांत अगदीं सुबक हाराप्रमाणें सुंदर व उत्तम (फारच खुलून दिसतील अशा) प्रकारें गुंफण्यांत आलें आहे. ह्यामुळेंच श्री जैन शासनांत पंचप्रतिक्रमणांस फार मोठें महत्त्व आहे. **आराधकांचें-साधकांचें जग ज्ञान आणि क्रिया ह्या दोन डोळ्यांनीं स्वतःची मोक्ष-साधना करतें.** धार्मिक क्रिया तर त्याचा फक्त एक डोळाच आहे. श्री प्रतिक्रमण सूत्रें म्हणजे श्री जैन शासनाप्रमाणें होणाऱ्या आराधनेचा-उपासनेचा पाया (मूळ आधारच आहे. ह्या श्री प्रतिक्रमण सूत्रांपासून प्राप्त होणारे आणि साधकतेच्या दिव्य स्वरूपाचें दर्शन करण्यास समर्थ असे **धार्मिक क्रिया व सूत्रांच्या अर्थाचें-रहस्याचें ज्ञान** —हे दोन निर्मल चक्षु (डोळे) आहेत. म्हणून ह्या प्रसंगीं आम्ही सर्वांस आठवण करूं इच्छितों कीं, केवळ क्रिया-चक्षूनें विशेष कार्यसिद्धि होऊं शकणार नाहीं, हें लक्षांत ठेवून आजच्या समयांत-परिस्थितींत क्रियाचक्षुस मदत करण्यासाठीं ज्ञानचक्षुला उघडण्याची आवश्यकता लक्षांत घेऊन त्यासाठीं प्रयत्न करा.

ज्ञानचक्षूस उघडण्याची-प्रतिक्रमणाच्या सूत्ररूपी पुष्प-फुलांचा अर्थज्ञानरूपी सुवास घेण्याची आवश्यता जरी प्रत्येक समयीं-युगांत असतेच असते, तरी देखील सध्यां ह्या अर्थज्ञानाकडे जें अत्यंत (कमालीचें) दुर्लक्ष केलें जात आहे,

 # शुद्धिपत्रक 

कित्येक कारणांमुळें या पुस्तकाचें प्रकाशन अगदीं थोडया वेळांत करावें लागल्यानें हें शुद्धिपकत्रक फक्त सिंहावलोकन करून तयार करावें लागलें आहे, तरीही महत्त्वाच्या अशुद्धि राहूं नये, याबद्दल शक्य ते सर्व प्रयत्न केले आहेत. या शुद्धिपत्रकाप्रमाणें चुका सुधारून वाचण्याची विनंति करतों.

— प्रकाशक

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४ | ५ | सूत्र म्हणून | क्रिया करून |
| १५ | १९ | तपस्वी | ( भगवंत ), तपस्वी |
| २४ | ६ | भगवान् ! | भगवन् ! |
| २७ | १० | श्रीआइमुत्ताजी | श्रीअइमुत्ताजी |
| ३८ | ९ | अरुग | आरुग |
| ५६ | ८ | दुरिय | दुरिअ |
| ५७ | १८ | चउवीस | चउवीसं |
| ५८ | १६ | संतुंजि | सत्तुंजि |
| १०४ | ७ | संति | संतिं |
| १२२ | ७ | सत्र | सूत्र |
| १२५ | १२ | सामाइयवजुत्तो | सामाइयवयजुत्तो |
| १२६ | १० | जगचिंतामणि ! | जगचिंतामणि ! |
| ,, | १३ | संठविअरूअ ! | संठविअरूव ! |
| १३२ | ९ | संति | संतिं |
| १५३ | २ | अधःकारास | अंधकारास |
| १५८ | १ | समवसरणाणाची | समवसरणाची |
| ,, | २० | बलकारानें | बलात्कारानें |
| १५९ | ३ | दुदैव | दुर्दैव |
| १६२ | २२ | समविलेलें | समाविलेलें |
| १७३ | २३ | रेो | रेटा |
| १८४ | ८ | चारिर | चारित्र |

# आदर्श दानवीर

हें 'प्रारंभिक पाठ्यक्रम' पुस्तक गुजरातीत इ. स. १९५१ मध्यें गुजराथी भाषेत प्रसिद्ध झालें होतें. हें पुस्तक म्हणजे स्वतःचें वैशिष्ट्य असलेलें अभिनव प्रकाशन होतें आणि त्याच कारणामुळें त्याचा सर्वत्र आदर झाला. या पुस्तकाची दुसरी आवृत्ति १९५२ मध्यें, तिसरी आवृत्ति १९५४ मध्यें व चौथी आवृत्ति १९५५मध्यें छापावी लागली, ही गोष्ट या पुस्तकाच्या लोकप्रियतेची साक्ष देते. या पुस्तकाचें हिंदी भाषांतर नुकतेंच प्रकाशित झालें आहे, त्यामुळें हिंदी भाषा जाणणारे लोक या पुस्तकाचा रसास्वाद घेऊं शकतीलच.

या पुस्तकाचा मराठी अनुवाद प्रसिद्ध करण्यासाठीं परमपूज्य **गुरुदेव मुनिराज श्रीजिनेंद्रविजयजी महाराज व पू. मु. श्रीचक्रभद्रविजयजी महाराज** यांच्या सदुपदेशानें **शिरपूर** (पश्चिम खानदेश) येथील **उदार नि धर्मप्रेमी श्रावक-श्राविका यांच्याकडून** यथाशक्तिप्रमाणें साहाय्य (मदत-दान) मिळालें आहे. त्या आदर्श दानवीरांचे आम्ही सदैव ऋणी आहोंत. त्यांचीं शुभ नांवें येथें प्रसिद्ध करतांना आम्हांस अगदीं मनापासून अपरंपार आनंद होत आहे.

इ. स. १९५५ च्या गुजराथी चौथ्या आवृत्तीच्या अक्षरा-अक्षरावर विचार करून (योग्य असलेला सुधारा करून नि आवश्यक असलेली भर घालून) हा मराठी अनुवाद तयार करण्यांत आलेला असून हें मराठी अनुवादाचें पुस्तक प्रसिद्ध करतांना आम्हांस खरोखर आनंद होत आहे.

अशाच प्रकारें उदार दानवीरांकडून नेहमी साहाय्य मिळावें व आम्हांस पुढील परीक्षांचीं पाठ्यपुस्तकें मराठी भाषेंत प्रसिद्ध करण्याची सुवर्ण संधि मिळावी हीच एकुलती एक मनःकामना !

—प्रकाशक

| रुपये | नांव |
|---|---|
| १०१ | श्री. रा. रा. शेठ खूबचंद हीराचंद |
| १०१ | श्री. रा. रा. शेठ वेलचंद लक्ष्मीचंद |
| १०१ | श्री. रा. रा. शेठ नगीनचंद लीलाचंद |
| १०१ | श्री. रा. रा. शेठ चंपालाल देवचंद |
| १०१ | श्री. रा. रा. शेठ कंकुचंद हीराचंद |
| १०१ | श्री. रा. रा. शेठ भागचंद माणेकचंद |
| १०१ | श्री. रा. रा. शेठ अमृतलाल दगडुशाह |

| रुपये | नांव |
|---|---|
| ७५ | श्री जैन श्राविका संघ |
| ५१ | श्री. रा. रा. शेठ गुलाबचंद कस्तुरचंद |
| ५१ | श्री. रा. रा. शेठ लक्ष्मीचंद धरमचंद |
| ५१ | श्री. रा. रा. शेठ मोतीलाल खूबचंद |
| ५१ | श्री. रा. रा. शेठ रतिलाल रेवचंद |
| २५ | श्री. रा. रा. शेठ माणेकलाल खूबचंद |
| २५ | श्री. रा. रा. शेठ मीठुभाई भवानजीभाई |
| २५ | श्री. गं. भा. मेताबाई हीराचंद |
| १५ | श्री. रा. रा. शेठ जेसिंगलाल वाडीलाल |
| १५ | श्री. रा. रा. शेठ प्रतापचंद दीपचंद |
| ११ | श्री. रा. रा. शेठ धनालाल खेमचंद |
| ११ | श्री. रा. रा. शेठ कंकुचंद रतनचंद |
| ११ | श्री. रा. रा. शेठ मणिलाल खेमचंद |
| ११ | श्री. रा. रा. शेठ धरमचंद रायचंद |
| ११ | श्री. रा. रा. शेठ फुलचंद मगनलाल |

महाराजांना. **एसो** – हे. **पंच** – पांच. **नमुक्कारो** – नमस्कार. **सव्व** – सर्व. **पाव** – पापांचा. **प्पणासणो** – संपूर्णपणें नाश करणारे आहेत. **मंगलाणं** – मंगलांत, मंगल करणाऱ्यांत. **च** – आणि. **सव्वेसिं** – सर्व (सगळ्यांत). **पढमं** – प्रथम, पहिले, श्रेष्ठ, उत्कृष्ट. **हवइ** – आहेत. **मंगलं** – मंगल, कल्याण करणारे.

## सूत्रार्थ

**नमो अरिहंताणं** – चार घाती कर्मांचा* नाश करणाऱ्या श्रीअरिहंत देवांना (माझा) नमस्कार असो. (अर्थात् मी त्यांना नमस्कार करतो.)

**नमो सिद्धाणं** – ज्यांनीं आठी कर्मांचा क्षय करून मुक्ति प्राप्त केलेली आहे – जे परम पवित्र झालेले आहेत, अशा श्रीसिद्ध देवांना नमस्कार असो.

**नमो आयरियाणं** – आचार्य महाराजांस नमस्कार असो.

**नमो उवज्झायाणं** – उपाध्यायजी महाराजांस नमस्कार असो.

**नमो लोए सव्वसाहूणं** – अडीच द्वीपाच्या मनुष्य लोकांत विहार (संचार) करणाऱ्या सर्व साधु व साध्वीजी महाराजांना नमस्कार असो.

**एसो पंचनमुक्कारो** – (वर सांगितलेल्या) पांची परमेष्ठींना केलेले हे नमस्कार.

**सव्वपावप्पणासणो** – पूर्वीच्या अनंत जन्मांत एकत्र केलेल्या सर्वच्या सर्व पापांचा नायनाट करतात.

**मंगलाणं च सव्वेसिं** – आणि ऐहिक व पारलौकिक सर्व मंगलांत.

**पढमं हवइ मंगलं** – प्रथम (उत्कृष्ट किंवा सर्व श्रेष्ठ) मंगल (कल्याण करणारे) आहेत.

---

* कर्मे आठ आहेत : चार घाती कर्मे आणि चार अघाती कर्मे. ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय व अंतराय हीं चार घाती कर्मे आहेत आणि वेदनीय, आयु, नाम नि गोत्र हीं चार अघाती कर्मे आहेत.

## भावार्थ

ह्या सूत्रांत पांची परमेष्ठ्यांना नमस्कार करण्यांत आला आहे. ह्यापैकीं एका परमेष्ठीसही खऱ्या प्रेमानें, नमस्कार केल्यानें सर्व संकटांचा नाश होतो नि भविष्यकाळ आनंद-मंगलानें परिपूर्ण होतो. ह्या सूत्राचें दुसरें नांव पंचमंगल महाश्रुतस्कंध असें असून ह्यास श्री नमस्कार महामंत्रही म्हणतात. हा नवकार मंत्र म्हणजे १४ पूर्वांचें सारच मानलें जातें. हा मंत्र शाश्वत अर्थात् अनादि (सनातन) आहे. ह्याचे कर्ते (रचणारे) कोणीही नाहीं; श्रीतीर्थंकर देव तर ह्या मंत्राचा फक्त आविर्भाव (मंत्रास प्रकाशांत आणण्याचें काम) करतात. वाचक जर सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करतील तर ह्या मंत्रांतील एक मुख्य गोष्ट लक्षांत येईल, ती अशी कीं अरिहंत हें कांहीं कोणी एका व्यक्तीचें नांव नाहीं. जे स्वतः संबुद्ध होऊन (ज्ञान प्राप्त करून) राग (= प्रेम) नि द्वेष ह्या दोन्ही अंतः शत्रूं-(अरि) चा नायनाट (हंत) करतात, अशा वीतरागी श्रीतीर्थंकर देवांचाच येथें 'अरिहंत' शब्दानें बोध होतो. अशा प्रकारें जेथें मूळ मंत्रांतच देवांचेंही नांव येत नाहीं, तर मग आचार्य किंवा उपाध्याय महाराजांचीं नांवें येणारच कोठून ? ह्याचेंच नांव गुणपूजा. जैन शासनांत व्यक्तिपूजा व दृष्टिरागास स्थानच नाहीं. ज्याप्रमाणें रामबाण औषधानें रोग जाऊन शरीरास पुष्टिही मिळते त्याप्रमाणें ह्या मंत्रामुळें — पांची परमेष्ठ्यांस नमस्कार केल्यानें (१) पूर्वीच्या सर्व पापांचा नाश व (२) भविष्यांत सर्वोत्कृष्ट मंगलाची प्राप्ति होते; अर्थात् हा मंत्र भूतकालाच्या सर्व पापांस (त्या पापांपासून येणाऱ्या संकटांस) दूर करून भविष्यास उज्ज्वल बनवितो. हा नवकार मंत्र ६८ अक्षरांचा संपूर्ण मानला जातो. ह्या मंत्राच्या जपानें सुद्धां जीवात्म्याचीं कर्मबंधनें क्षीण होतात नि तो जीवात्मा (हळु हळु) पवित्र होतो. ह्या मंत्राचा नऊ लाख जप केल्यानें जीवात्म्यास नरकांत जावें लागत नाहीं.

## परिमल

- विधि-विधानाप्रमाणें नवकार मंत्राचा नऊ कोटी जप करणारा जीवात्मा फक्त तीन जन्मांत मोक्षास जातो. [ नवकार मंत्राच्या जपाचें विधि-विधान — देव, त्यांची तसबीर ( चित्र ) किंवा श्रीसिद्धचक्राच्या समोर आधीं इरियावहियं सूत्र म्हणून मग ५-१०-१५ अशा प्रकारें पांचाच्या गुणकांत नवकार मंत्राच्या माळा जपाव्या, ह्या गुणकापेक्षां कमी किंवा अर्ध्या माळा जपूं नयेत. जप करते वेळीं स्वच्छ धुतलेले व पवित्र ( सोळे ) कपडे घालावे. ]
- शाश्वत नवकार मंत्र शाश्वत अशा जीवात्म्यास शुद्ध बनवून त्याच्या अनंत असंख्य दुःखांचा नाश करतो — हेंच ह्या नवकार मंत्राचें माहात्म्य होय.
- नवकार महामंत्राच्या प्रभावाचा चमत्कार ज्यांना पहावयाचा असेल त्यांनीं सहा महिनेपर्यंत नित्य-तिन्ही त्रिकाळ नवकार मंत्राच्या माळेचा जप करावा.
- ज्याप्रमाणें पोहणारा पायानें मागील पाण्यास रेटतो नि हातानें पुढील जलप्रवाहास बाजूस सारून सुरक्षितपणें पुढें पुढें पोहत जातो त्याचप्रमाणें नवकार मंत्राचा जप करणारा साधक पूर्वसंचित ( मागील ) पापांचा नाश करतो आणि येणाऱ्या भविष्यकाळच्या संकटांना दूर करत करत साधना मार्गांत आपली उन्नति करतो. ह्या नवकार मंत्राचें निरंतर स्मरण करणारा साधक ह्या अगाध व भीषण संसार-समुद्रास सुद्धां अगदीं सहज ( हंसत-खेळत ) पोहून जातो.
- पांची परमेष्ठींच्या गुण पूजेंतील उदारता नि विशालता, खरोखर, श्री नमस्कार महामंत्राची भव्यता-महत्त्व दाखवितात. ह्या मंत्राच्या अहर्निश स्मरणानें जीवात्म्याच्या रोमारोमांत चैतन्याचा आविर्भाव होतो व त्यास स्वतःच्या स्वरूपाचें ज्ञान होतें. ह्या मंत्राच्या शब्दा-शब्दांत नि अक्षराचा-अक्षरांत प्राणीमात्राबद्दल वात्सल्यभाव-प्रेमभाव ओतप्रोत भरलेला आहे.
- चौदा पूर्वांचें सार म्हटलें म्हणजे नवकार मंत्र आणि त्यांत तर 'नमो'

या पहिल्या शब्दानेंच आपणावर उपकार करणाऱ्या परमेष्टयांना नमस्कार करण्याची शिकवणूक दिली जाते. यामुळें धर्माचें मूळ विनय–विवेक आहे, हें सहज समजून येतें.

※ पांची परमेष्टयांचे ( श्रीअरिहंत देवाचे १२ + श्रीसिद्धांचे ८ + आचार्य महाराजांचे ३६ + उपाध्ययांचे २५ + साधु-साध्वीजी महाराजांचे २७ ) एकूण गुण १०८; म्हणून १०८ मणि असलेल्या माळेनें जप करणें किंवा त्या पांची परमेष्टयांना नमस्कार करणें, यांतील आदर्श भावना अशी कीं त्यांचे ते उत्तम असे गुण आमच्यांत उत्पन्न व्हावेत, आम्हास मिळावेत.

※ नवकार मंत्रांत अडीच द्वीपाच्या मनुष्यलोकांतील भूत, भविष्य व वर्तमान या तिन्ही काळच्या सर्व तीर्थंकर देव, आचार्य महाराज, उपाध्यायजी महाराज व साधु-साध्वीजी महाराज आणि शिवाय श्रीसिद्ध देवांची गुणपूजाच आहे. यामुळें सुद्धां हा श्री नमस्कार महामंत्र अत्यंत चमत्कारिक नि प्रभावशाली आहे असें समजून येतें.

※ 'नमो अरिहंताणं' हें पद आम्हांस असें शिकवितें कीं ज्याप्रमाणें आज आपल्या भरत क्षेत्रांत तीर्थंकर देवाशिवायचा ( अनवतार ) काल आहे, त्याप्रमाणें संपूर्ण मनुष्य लोकांत ( अडीच द्वीपांत ) असा काल केव्हांही नसतो. मनुष्य लोकांत तर २० किंवा जास्त तीर्थंकर देवांचें अस्तित्व असतेंच. स्वतःच्या नाथाशिवाय ही पृथ्वीदेवी राहूंच शकत नाहीं. येथें भरत क्षेत्रांत नसले तर महाविदेह क्षेत्रांत तरी तीर्थंकर देव असणारच. महाविदेह क्षेत्रांत सध्यां सुद्धां चार घाती कर्मांचा क्षय करुन विजयपूर्वक विहार ( भ्रमण, संचार ) करणारे वीतरागी श्रीतीर्थंकर देव आहेतच. आणि या कारणामुळें आम्ही आजही भाव तीर्थंकारांना नमस्कार म्हणून सुद्धां 'नमो अरिहंताणं' हें पद गौरवानें बोलूं शकतो.

※ फक्त नातेवाईकांस किंवा ओळखीच्यांनाच नूतन वर्षाभिनंदन केलें–पाठविले जातें; परंतु ज्यांची आमच्याशीं कांहीं ओळख–पाळख नाहीं व ज्यांना आम्ही पाहिले देखील नाहीं, अशा ही ( अडीच द्वीपाच्या मनुष्य लोकांत–कर्मभूमींत विहार करणाऱ्या व महाव्रतांचे पालन करणाऱ्या ) सर्व साधु-साध्वीजी महाराजांस 'नमो लोए सव्वसाहूणं'

ह्या पदानें आम्ही नमस्कार करूं शकतो. केवढें हें आमचें सद्भाग्य! ह्यामुळें जैन शासनाचें विशाल औदार्य ( व धर्मप्रेम ) ही कळून येतें.

- नमस्कार महामंत्र म्हणजे १४ पूर्वांचे सार, ४५ आगमांचें तत्त्व, आणि म्हणूनच एका बाजूस ज्ञानी विद्वान् पुरुष ४५ आगमांचें तत्त्वमंथन करून आपलें कल्याण साधून घेतात, तर दुसऱ्या बाजूस सर्वसामान्य अज्ञानी माणसें सुद्धां श्रद्धेनें नवकार मंत्राचा जप करून आपलें श्रेय सिद्ध करूं शकतात. आगम वाचण्याचा नि त्यांचा अभ्यास करण्याचा अधिकार फक्त साधु आदि महाराजांसच आहे, बाकीच्या श्रावक-श्राविका समाजास तर विशेषतः नवकार मंत्राचाच मोटयांत मोठा आधार आहे.

- ' नमो ' शब्दाचा भाव ( रहस्य ) — पांचीं परमेष्ठी पूज्य ( आदरणीय ) आहेत आणि आम्ही त्यांचे पुजारी ( सेवक ) आहोत.

- नवकारांत व्यक्तिपूजेस नाहीं पण गुणपूजेसच जास्तींत जास्त महत्त्व दिलें गेलें आहे, आणि ह्यामुळें सुद्धां ह्यास ' महामंत्र ' म्हणतात. ह्यामुळें एक गोष्ट सिद्ध होते ती अशी कीं जैन दर्शनांत संकुचितपणा नसून सार्वभौम उदारतेचें भव्य दर्शन होतें.

- ' अरिहंताणं ' ह्या बहुवचनी प्रयोगानें फक्त कोणी एकाच जीवात्म्यास देव किंवा ईश्वर होण्याचा अधिकार सिद्ध होत नाहीं. प्राणीमात्रांचें कल्याण करण्याच्या भावनेनें ( व त्याप्रमाणें साधना करण्यानें ) आपल्या सारखा कोणीही जीवात्मा अरिहंत किंवा तीर्थंकर होऊं शकतो. आणि अशा प्रकारें वीतरागी तीर्थंकर देव अनंत झाले आहेत व होतीलही.

- पू. पंडित प्रवर श्री वीरविजयजी महाराजांचें नवकार मंत्रानें गुजराथी भाषेंतील खालील पद वाचा. सर्वांना समजेल अशा सरळ-साध्या भाषेंत नवकार मंत्राच्या प्रभावाचें सुंदर वर्णन केलें आहे.

समरो मंत्र भलो नवकार, ए छे चौद पुरवनो सार ।
एना महिमानो नहि पार, एनो अर्थ अनंत उदार ॥ समरो० १ ॥
सुखमां समरो, दुःखमां समरो, समरो दिवस ने रात ।
जीवतां समरो मरतां समरो, समरो सौ संघात ॥ समरो० २ ॥

**भावार्थ** — आमचा नांवाशीं कांहींच संबंध नाहीं. मग तें नांव कपिल असो किंवा महावीर असो, केवळ नांवामुळें आम्ही कोणाचाही पक्षपात करणार नाहीं. ज्याचें म्हणणें सायुक्तिक असेल त्याचेंच म्हणणें आम्हास ग्राह्य आहे.

**प्रश्न ५** — नवकार मंत्राचा जप केव्हां करावा ?

**उत्तर** — ( गुजराथी दोहा ) – सूतां बेसतां उठतां, जे समरे अरिहंत।
दुःखीयानां दुःख भांगशे, लहेशे सुख अनंत ॥

नवकार मंत्र म्हणजे १४ पूर्वांचें सार ! १४ पूर्वांचें संपूर्ण ज्ञान असलेल्या महामुनिराजांना सुद्धां अंतकाळीं ( अशाता वेदनीयाच्या – अत्यंत दुःखाच्या उदयामुळें शिकलेल्या पूर्वांचें विस्मरण होतें किंवा त्या पूर्वांचें मनन-चिंतन करण्यास वेळ राहात नाहीं तेव्हां ) ह्या महामंत्राचाच आश्रय घ्यावा लागतो. प्रभु श्रीपार्श्वनाथस्वामींनीं कुमारावस्थेंत अग्नींत जळत असलेल्या एका नागास हा मंत्र ऐकविला. नवकार मंत्र फक्त ऐकण्याच्याच प्रभावानें-पुण्यानें तो नाग मरणानंतर धरणेंद्र झाला. किती महान्-अनंत नि आश्चर्यकारक प्रभाव आहे ह्या मंत्राचा !

**प्रश्न ६** — ३ ऱ्या, ४ थ्या व ५ व्या पदीं असलेले परमेष्ठी तर स्वतः वीतरागी नाहींत, तर मग ते पूज्य-वंद्य कसे ? आणि त्याचप्रमाणें दुसऱ्या छद्मस्थ मनुष्यांस ह्या मंत्रांत स्थान कां दिलें गेलें नाहीं ?

**उत्तर** — रूपा-रंगानें जरी हे तिघेही परमेष्ठी जगांतील दुसऱ्या छद्मस्थ ( अज्ञानी ) मनुष्याप्रमाणें दिसत असले तरीही ह्या संसारांत राहून विषयासक्त होणाऱ्या पुरुषांपेक्षां ऐहिक सुखांचा त्याग करणाऱ्या ह्या तिघांही त्यागवीरांची किंमत केव्हांही जास्तच आहे — ही गोष्ट सगळ्यांना मानावीच लागेल. हे तिघे वीतरागी नाहींत, पण वीतरागी होण्याचा सतत-अहर्निश प्रयत्न करीत असतात आणि श्रीवीतरागी देवांनीं सांगितलेल्या मोक्ष मार्गाचाच नेहमीं उपदेश करतात. हे तिघेही कनक-कामिनीचे त्यागी व मोक्षमार्गाचे अनुरागी-प्रेमी असल्यामुळेंच आम्हांस पूज्य-वंद्य आहेत. जगांतील दुसरे छद्मस्थ पुरुष इतके त्यागी,

आत्मार्थी, उपकारी नि पूज्य नाहींत आणि म्हणूनच पवित्र अशा नवकार महामंत्रांत छद्मस्थांना स्थान देणें शक्य नाहीं.

**प्रश्न ७** — श्री नवकार मंत्र व श्री सिद्धचक्र यंत्र यांचा संबंध समजवा.

**उत्तर** — श्री सिद्धचक्र यंत्रांत नऊ पदें आहेत. पांच परमेष्ठयांची पांच व दर्शन-ज्ञान-चारित्र-तप हीं चार, एकूण नऊ; तर श्री नवकार मंत्रांतील पांच परमेष्ठयांत पहिले दोन देव आहेत नि शेवटचे तीन गुरूच्या पदास शोभास्पद ( शोभविणारे-असे ) आहेत. अशा प्रकारें धर्माचे आगर ( सागर ) व धर्माचे दाते देव आणि धर्माचे दाते गुरु महाराज हे दोघेही नवकार मंत्रांत असल्यानें गुणगुणी संबधानें धर्मस्वरूप दर्शन, ज्ञान, चारित्र नि तपही ह्या महामंत्रांत आहेतच. देव आणि गुरु गुणी आहेत तर दर्शन, ज्ञान, चारित्र नि तप हे आत्म्याचे गुण आहेत. 'लाल घडा' असें म्हणण्यांत लाली ( लालपणा ) कांहीं घड्या वेगळी नाहीं — आणि हाच गुणगुणी संबंध झाला. चैत्र आणि आश्विन महिन्यांतील नवपदाच्या नवरात्रांत ( ओळींत ) प्रकारांतरानें ( दुसऱ्या तऱ्हेनें ) श्री नवकार मंत्राचीच आराधना केली जाते, असेंही म्हणता येईल. अशा प्रकारें खरोखर पाहिले असतां ( वस्तुतः ) श्री नवकार मंत्र आणि श्री सिद्धचक्र यंत्र ह्यांत अभेद आहे, दोन्ही एकच आहेत — आणि हाच त्यांचा एक दुसऱ्याशीं संबंध आहे.



# ( २ ) श्री पंचिंदिय (स्थापना) सूत्र

## अन्वयार्थ

**पंचिंदिय** — पांचीं इंद्रियांना. **संवरणो** – स्वतःच्या काबूंत ठेवणारे. **तह** – त्याचप्रमाणें. **नवविह** – नऊ प्रकारच्या. **बंभचेर** – ब्रह्मचर्य

व्रताच्या. **गुत्तिधरो** – गुप्तींचें रक्षण करणारे. **चउविह** – चार प्रकारच्या. **कसाय** – कषायापासून. **मुक्को** – मुक्त, दूर, अलिप्त. **इय** – (इति) अशा-प्रकारें. **अट्ठारस** – अठरा. **गुणेहिं** – गुणांनीं. **संजुत्तो** – विभूषित. [ १ ]. **पंच** – पांच. **महव्वय** – महान् व्रतांनीं, प्रतिज्ञांनीं. **जुत्तो** – युक्त. **पंचविहायार** – पांच प्रकारच्या आचारांचें. **पालण** – पालन–आचरण करण्यास. **समत्थो** – समर्थ. **पंचसमिओ** – पांच प्रकारच्या समितींचें पालन (रक्षण, आचरण) करणारे. **तिगुत्तो** – मनोगुप्ति, वचनगुप्ति आणि कायगुप्ति–ह्या तिन्ही गुप्तींचें रक्षण (पालन) करणारे. अशा प्रकारें एकूण. **छत्तीस** – छत्तीस. **गुणो** – गुणांनीं सुशोभित. **गुरु** – गुरु महाराज. **मज्झ** – माझे. [ २ ].

## सूत्रार्थ

**पंचिंदियसंवरणो** ( ५ ) – पांचीं इंद्रियांच्या आवेगांस आपल्या स्वतःच्या काबूंत ठेवणारे.

**तह नवविहबंभचेरगुत्तिधरो** ( ९ ) – त्याचप्रमाणें ब्रह्मचर्य व्रतांच्या गुप्तींचें ( शीलव्रताच्या स्थानांचें ) रक्षण करणारे.

**चउविहकसायमुक्को** ( ४ ) – क्रोध, मान, माया आणि लोभ ह्या चार प्रकारच्या कषायांपासून दूर राहाणारे.

**इय अट्ठारसगुणेहिं संजुत्तो** – अशा प्रकारें अठरा गुणांनीं विभूषित. [ १ ].

**पंचमहव्वयजुत्तो** ( ५ ) – १ हिंसा न करणें. २ खोटें न बोलणें. ३ चोरी न करणें. ४ स्त्रियांना स्पर्श सुद्धां न करणें. ५ कोणत्याही प्रकारचा ( रुपये-पैसे, धन-धान्य वगैरेंचा ) परिग्रह न करणें — ह्या पांच महाव्रतांनीं युक्त.

**पंचविहायारपालणसमत्थो** ( ५ ) – ज्ञानाचार, दर्शनाचार,

चारित्राचार, तपाचार आणि वीर्याचार, – ह्या पांची प्रकारच्या आचारांचें पालन करण्यांत समर्थ अर्थात् सकळ पुरुषार्थी व शक्तिसंपन्न.

**पंचसमिओ तिगुत्तो (५ + ३)** – पांची समितींचें पालन करणारे आणि मन, वचन व काया – ह्यांच्या अशुभ ( पापयुक्त ) क्रियांपासून दूर राहाणारे — तिन्ही गुप्तींचें पालन करणारे.

**छत्तीसगुणो गुरु मज्झ** – ( अशा प्रकारें वर वर्णन केल्याप्रमाणें ) छत्तीस गुणांनीं समलंकृत माझे गुरु महाराज आहेत. (त्यांची मी स्थापना–आवाहन करतो. ) [ २ ].

## भावार्थ

ह्या सूत्रांत आचार्य महाराजांच्या छत्तीस गुणांचें वर्णन केलेलें आहे. आचार्य महाराज किंवा गुरु महाराजांची हाजरी नसेल तेव्हां उपदा हात धरून नवकार आणि पंचिंदिय ह्या दोन सूत्रांनीं गुरु महाराजांच्या आदर्श गुणांची स्थापना करण्यांत येते आणि मग त्या स्थापनाचार्यांच्या समोर (जणूं कांहीं स्वतः गुरु महाराजच समोर विद्यमान आहेत, अशा भावनेनें ) आपण सामायिक वगैरे धार्मिक क्रियाकांड करूं शकतो. गुरु महाराजांच्या जागेवर उच्च स्थानीं ग्रंथ (पुस्तक), जपाची माळ (नवकारवाळी), ठीयाळ (गुजराथी शब्द–सापडा ) किंवा सम्यग्र दर्शन–ज्ञान–चारित्राचें कोणतेंही उपकरण ठेवून नवकार व पंचिंदिय सूत्र म्हणून स्थापनाचार्यांची स्थापना केली जाते. ह्या स्थापनाचार्यांच्या सान्निध्यांत सुद्धां केलेली धार्मिक क्रिया शुद्ध ( पूर्ण ) होऊं शकते. आणि म्हणूनच ह्या सूत्राचें दुसरें नांव स्थापनासूत्र ही आहे.

## परिमल

❋ शरीरास आणि मनास स्वतःच्या ताब्यांत ठेवण्यासाठीं अत्युत्तम साधन अशा ह्या पांच समिति नि तीन गुप्ति शरीरांत असलेल्या आत्म्यावर अहर्निश डोळ्यांत तेल घालून पहारा करीत असतात. आणि जर ह्या

गुरुमहाराजांच्याच आचारांत नसत्या तर त्यांचा आदर – मान-सन्मान कोणी केला असता बरें ? ह्यांच्यामुळेंच तर गुरु महाराज निर्मळ (विशुद्ध) व पवित्र अंतःकरणाचें मानले जातात नि स्वतःचा आदर्श प्रभाव (दरारा) सर्व जगतावर पाडूं शकतात.

- स्वतःच्या मन, वचन आणि कायेवर त्यांचा केवढा तावा आहे व त्यांच्या अंतःकरणांतील भावना किती पवित्र नि उच्च आहेत ह्याचा साक्षात्कार आम्हांस गुरु महाजांच्या आचरणांतून — पांच समितींच्या व तीन गुप्तींच्या पालनांतून होतो.
- समिति शब्दाचा अगदीं सोपा अर्थ म्हणजे धार्मिक अनुष्ठानांत सम्यग् उपयोगपूर्वक (अचूक प्रकारानें) करण्यांत येणारी प्रवृत्ति. त्याचप्रमाणें चंचल अशा मन, वचन नि कायेस स्थिर करणें—शांत करणें किंवा त्यांना अशुभ प्रवृत्तीपासून (पापाचरणापासून) दूर ठेवणें—हा झाला गुप्तीचा सरलार्थ.
- सध्यां जगांत वेगवेगळ्या कामासाठीं वेगवेगळ्या समितींची स्थापना केली जाते व त्याच्या द्वारा व्यवस्थातंत्र सुरळीत चालविलें जातें. ह्याचप्रमाणें आत्म्याचें (धार्मिक जीवनरूपी) व्यवस्थातंत्र सुरळीत चालावें म्हणून श्रीवीतरागी देवांनीं पांच समितींची नि तीन गुप्तींची योजना केलेली आहे — असें पण एका दृष्टीनें म्हणता येईल.
- साधारणपणें आपल्या स्वार्थी तोंडांत दुसऱ्यांना दुःख होईल असें बोलण्याची कर्कशता (कटुपणा) असतेच. आणि म्हणूनच गोड बोलण्याच्या अभ्यासासाठीं (गुळाची वाचा मिळविण्यासाठीं) श्रीवीतरागी देवांनीं साधु महाराजांकरितां भाषा समितीचें पालन विशेषरूपानें सांगितलें आहे.

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १— पंचिंदिय सूत्राचा उपयोग काय? त्यांत काय येतें ?

उत्तर— सामायिक करण्यासाठीं स्थापनाचार्यांची स्थापना करतेवेळीं नवकार मंत्रानंतर लगेचच हें सूत्र म्हटलें जातें. ह्या सूत्रांत आचार्य महाराजांच्या ३६ गुणांचें वर्णन आहे.

प्रश्न २— आचार्य महाराजांचे ३६ गुण कोणते कोणते ?

उत्तर- ५ इंद्रियांच्या आवेगांना स्वतःच्या काबूत ठेवण्याचे, ९ शीलव्रता (ब्रह्मचर्या)चें पालन करण्याचें, ४ कषायांना जिंकण्याचें, कषायापासून दूर रहाण्याचे, ५ महाव्रतांचें पालन करण्याचे, ५ महान् आचारांचें आचरण करण्याचे, ५ समितींना धारण करण्याचे आणि ३ गुप्तींचे पालन करण्याचे -- अशा प्रकारें आचार्य महाराजांचे ३६ गुण आहेत. ह्या ३६ गुणांनीं अलंकृत (तेजस्वी) अशेच आचार्य महाराज पंचपरमेष्ठींतील 'आचार्य' ह्या तिसऱ्या पदास शोभवितात (उज्वल करतात). ह्या गुणांमुळेंच त्यांना 'भावाचार्य' असेंही म्हणतात.

प्रश्न ३- पांची इंद्रियांचीं कामें रोजच्या व्यवहाराच्या भाषेंत समजवा.

उत्तर- (१) स्पर्शेन्द्रिय (चामडी)- स्पर्श जाणण्याचें काम.
(२) रसनेंद्रिय (जीभ)-रसास्वादाचें ज्ञान, चाखण्याचें काम.
(३) घ्राणेंद्रिय (नाक)- गंधज्ञान, वास घेण्याचें काम.
(४) नेत्रेंद्रिय (डोळे)- पहाण्याचें काम.
(५) श्रोत्रेंद्रिय किंवा कर्णेन्द्रिय (कान)- ऐकण्याचें काम.
(इंद्रियांचा क्रम सुद्धां असाच असला पाहिजे.)

एक इंद्रियवाल्या जीवांना मात्र स्पर्शेन्द्रियच असतें. दोन इंद्रियवाल्या जीवांना स्पर्शेन्द्रिय नि रसनेंद्रिय अशीं दोन इंद्रियें असतात. ह्याचप्रमाणें तीन इंद्रियवाल्या जीवांना घ्राणेंद्रिय, चार इंद्रियवाल्या जीवांना नेत्रेंद्रिय नि पांच इंद्रियवाल्या जीवांना श्रोत्रेंद्रिय—अशीं एकेक इंद्रियें उत्तरोत्तर अशा क्रमें जास्त असतात.

प्रश्न ४- पांचीं महाव्रतांचें स्वरूप समजवा.

उत्तर- (१) प्राणातिपातविरमण- जीवहिंसा न करणें.
(२) मृषावादविरमण- खोटें न बोलणें.
(३) अदत्तादानविरमण- चोरी न करणें.
(४) मैथुनविरमण-ब्रह्मचर्याचें पालन करणें.
(५) परिग्रहविरमण- धन-धान्यादीचा संग्रह न करणें..

सूक्ष्म जीवदयेचें पाळन आणि कंचन-कामिनीचा त्याग हींच दोन ह्या महाव्रतांतील मुख्य तत्त्वें आहेत. आज तर सगळें जगच स्त्री आणि पैशाच्या मागें वेडें झालें आहे आणि म्हणूनच हीं पांच महाव्रतें त्यास फार अवघड वाटतात. अर्थ नि कामाची उपासना केल्यामुळें आज सारें जग गांजून गेले आहे–त्राहि त्राहि करीत आहे. ह्या कारणांमुळेंच महाव्रताचें तत्त्व अत्यंत महत्त्वाचें आहे, असें सिद्ध होतें.

प्रश्न ५– पांची समितींचीं नांवें व त्यांची समजूत लिहा.

उत्तर — (१) ईर्या समिति — रस्त्यांतून येता-जाता जीवहिंसा होणार नाहीं अशा प्रकारें चालणें.

(२) भाषा समिति — बोलण्यांत सुद्धां संयमपूर्वक, योग्य, आवश्यक, गोड नि हितकर बोलणें.

(३) एषणा समिति — अन्न, पाणी वगैरे आवश्यक वस्तु निर्दोष अशा प्राप्त करणें. [ उदा. – मुनिराज गोचरी (मधुकरी), पाणी वगैरे दूषित होऊं नये म्हणून फारच काळजी घेतात. ]

(४) आदानभंडमत्तनिक्षेपणा समिति — पात्र (भांडीं) वगैरे आवश्यक वस्तूंना घेतांना–ठेवतांना प्रमार्जना करणें, यतना ठेवणें. (जीवहिंसा न होण्याची काळजी घेणें.)

(५) पारिष्टापनिका समिति — मळ, मूत्र वगैरे घाण व टाकण्याच्या वस्तु टाकून देतांना जीवयतना ठेवणें.

प्रश्न ६ — तिन्ही गुप्तींचीं नांवें व त्यांची समजूत लिहा.

उत्तर — (१) मनोगुप्ति — मनाच्या अशुभ विचारांवर ताबा ठेवणें.

(२) वचनगुप्ति — बोलण्यावर संयम ठेवणें. दुसऱ्यास दुःख होईल असें न बोलणें.

(३) कायगुप्ति — कार्यप्रसंगानें उठतांना, बसतांना,

येतांना, जातांना वगैरे प्रमार्जनापूर्वक शरीराची हालचाल करणें.

प्रश्न ७ — स्थापनाचार्यांची स्थापना करतेवेळीं हात उपडा कां धरला जातो ?

उत्तर — एखादी वस्तु एखाद्या ठिकाणीं ठेवतांना किंवा कोणालाही देतांना हात उपडाच धरला जातो. येथें गुणांची स्थापना-गुणांचें आरोपण केलें जात असल्यानें हात उपडा (पालथा) धरला जातो. सूत्रांत सांगितलेल्या गुणांनीं विराजमान अशांनाच मी गुरु मानून त्या परम पवित्र गुरुमहाराजांसमोर हें धर्मकृत्य करतों — हें गुणांच्या आरोपणांतील रहस्य आहे.



# ( ३ ) श्री खमासमण (प्रणिपात) सूत्र

## अन्वयार्थ

**इच्छामि**- मी इच्छा करतो. **खमासमणो**- अहो क्षमाश्रमण (क्षमेला धारण करणारे मुनिराज), तपस्वी महाराज! **वंदिउं**- वंदन करण्यासाठीं. **जावणिज्जाए**- यथाशक्ति, शक्ति अनुसार. **निसीहिआए**- पाप-व्यापारांचा, पापी कर्मांचा त्याग करून. **मत्थएण**- शिरसा, डोकें लावून. **वंदामि**- (शरीरानें सुद्धां) वंदन करितो.

## सूत्रार्थ

**इच्छामि खमासमणो ! वंदिउं** — अहो क्षमाश्रमण तपस्वी मुनिराज ! मी आपणास वंदन करूं इच्छितो.

**जावणिज्जाए निसीहिआए** — माझ्या शक्ति अनुसार (अंग चोरल्या वांचून) पाप-व्यापारांचा त्याग करून.

**मत्थएण वंदामि** — डोकें लववून मी वंदन करतो.

## भावार्थ

**दोन गुडघे, दोन हात नि डोकें ह्या पांची अंगांनीं जमिनीस स्पर्श करून केलेल्या प्रणामास-वंदनास खमासमण म्हणतात. ह्या सूत्राचें दुसरें नांव 'पंचांग प्रणिपात सूत्र' असें ही आहे.**

## परिमल

- देवांना, गुरु महाराजांना किंवा ज्ञानास वंदन करण्यासाठीं डोकें लवविलें जातें, हें नम्रता नि विनय ह्या गुणांचें द्योतक आहे.
- ज्याप्रमाणें पाश्चात्य देशांत सलाम करण्याचा रिवाज आहे आणि आर्यावर्तांत-भारतांत हात जोडून प्रेमपूर्वक नमस्कार करण्याची पद्धत आहे, त्याचप्रमाणें शास्त्रीय पद्धत 'पंचांग प्रणिपात' करण्याची आहे. आणि त्यांतही ह्या शब्दांचा उच्चार करून वंदन केलें पाहिजे, असें हें सूत्र आम्हांस शिकविलें.
- मोठ्या माणसासमोर किंवा विद्वान्-शिष्ट मंडळींत बोलतांना घरीचशीं माणसें थरथरा कांपतात कारण कीं त्यांच्या समोर हीं अगदींच अज्ञाणी आहेत. ह्यांचें अज्ञानच ह्यांना थरथरा कांपविलें. त्याचप्रमाणें देव नि गुरु महाराज यांना वंदन करणाऱ्याचीं कर्में वंदन करतेवेळीं कांपूं लागतात. आणि म्हणूनच वंदनानें घोर (महाभयंकर पाप-) कर्मांचा नाश होतो, ह्यांत नवल तें काय?

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — खमासमण सूत्राचें दुसरें नांव काय? ह्या सूत्राचा उपयोग सांगा.

उत्तर — खमासमण सूत्राचें दुसरें नांव प्रणिपात सूत्र आहे. ह्या

सूत्रानें देव-गुरूंना प्रणाम केला जातो. स्वतः दोषांनीं परिपूर्ण असूनही असे सद्गुणनिधान गुरु महाराज भेटल्यानें हृदय विनयान्वित (आनंदित) होतें आणि मग तर शरीराचें श्रेष्ठ अंग–डोकें स्वतः होऊनच लवतें. गुणवंतांस प्रणाम केल्यानें आपलें अज्ञान किती आहे, हें आपल्या लक्षांत येतें व पूज्यांची–वंदनीयांची विशेष गुणसंपन्नताही अगदीं स्पष्ट दिसून येते. असे उत्तमोत्तम गुण माझ्यांत केव्हां येतील ? — अशी आतुरताही उत्पन्न होते.

प्रश्न २ — प्रणाम कसा केला जातो ? त्याचें नांव काय ?

उत्तर — दोन्ही गुडघ्यावर जमिनीवर बसून, दोन्ही हात जोडून व डोकें लववून जमिनीचा स्पर्श करून प्रणाम केला जातो — त्यास 'पंचांग प्रणिपात' असें म्हणतात. असा नमस्कार करण्यापूर्वी 'निसीहि' हा शब्द म्हणून घर–संसारांतील सर्व पाप-व्यापारांचा (पाप कर्मांचा) त्याग केला जातो. जर दुसऱ्या सर्व प्रवृत्तींना मन विसरून जाईल (त्यांपासून निवृत्त होईल) तरच प्रणामांत भावशुद्धि येऊं शकते. ह्या कारणामुळें मंदिरांत किंवा उपाश्रयांत देव किंवा गुरु यांच्या जवळ जातांना 'निसीहि' असें म्हणण्याचा परिपाठ व विधि आहे. येथें व्यापार शब्दाचा अर्थ प्रवृत्ति किंवा कर्म.

प्रश्न ३ — नमन आणि वंदन यांत कांहीं फरक आहे खरा ?

उत्तर — 'नमो अरिहंताणं' मधील नमस्कार मानसिक सुद्धां होऊं शकतो आणि म्हणूनच नवकारवालींत (माळेनें जप करतांना) ह्यास नवकार मोजतात. ह्यांत भावपूर्वक हार्दिक नमस्कारच मुख्य आहे, शरीरानें–डोकें लववून (जप करतांना) श्रीअरिहंत देवांना प्रणाम करावयाचा नसतो, पण फक्त भाव नमस्कार करूनच संतोष मानून घ्यावा लागतो. खमासमण (वंदन) करतांना तर शरीर वांकवावेंच लागतें – शरीर अर्थात् डोकें लवविल्याशिवाय 'खमासमण सूत्र' बोललेंच जात नाहीं. येवढें

विनयामुळें त्यांच्या गुणांचें आकर्षण होतें. ( ते उत्तम गुण आपणांत येऊं शकतात. )

✲ श्रीवीतरागी देवांच्या आज्ञेचें यथार्थ-संपूर्ण ( अक्षरशः ) पालन तर समर्थ गुरु महाराजच करूं शकतात. त्यांच्या दृष्टीनें तर आम्ही जिनाज्ञेचें अंशतः सुद्धां पालन करूं शकत नाहीं. आणि म्हणूनच आम्हांस गुरु महाराज पूजनीय-वंद्य आहेत.

✲ ज्याप्रमाणें शिक्षकाशिवाय शाळा चालूं शकत नाहीं त्याप्रमाणें गांवोगांवीं विहार करणाऱ्या ( पायीं-पायीं यात्रा करणाऱ्या ) गुरु महाराजांशिवाय धर्माचा मार्ग चालूं शकणारच नाहीं. गुरु महाराजांखेरीज भव्य ( भवी, दैवी-संपत्तीच्या ) जीवात्म्यांना सद्धर्माचा उपदेश दुसरा कोण देऊं शकणार? नि भोग-विलासांत गर्क झालेल्यांच्या उपदेशाचा प्रभावही तो काय पडणार? गुरु महाराज तर कंचन-कामिनीचे त्यागी आहेत आणि म्हणूनच त्यांच्या उपदेशाचा अगदीं बरोबर प्रभाव पडतो.

✲ गुरु महाराजांनीं आमरणांत खोटें न बोलण्याची प्रतिज्ञा घेतली आहे, म्हणूनच त्यांच्या म्हणण्यावर आपण विश्वास ठेवतो. गुरु महाराज आम्हांस जो उपदेश करतात, तो सर्वच्या सर्व श्रीवीतरागी नि केवळज्ञानी देवांच्या वचनाप्रमाणेंच असतो. ते कांहीं स्वतःच्या मनाचें – कपोलकल्पित सांगूं शकत नाहींत.

घाण झालेल्या कपड्यांतील मळ परीट धुऊन काढतो, त्याचप्रमाणें गुरु महाराज आमच्या आत्म्यांतील दोष नि रोग नाहींसे करतात आणि आम्हांस पवित्र बनवितात.

- विमानास नक्की केलेल्या ठिकाणीं घेऊन जाण्यासाठीं पायलट (वैमानिक) असतात तर धर्ममार्गात आमचे कर्णधार गुरु महाराज आहेत. पायलट सुशिक्षित असतो तर पूज्य गुरु महाराजही जिनाज्ञांचीं मर्में जाणणारे असतात. पायलट जर अशिक्षित किंवा अडाणी असेल (विमान चालविण्याच्या कामीं हुषार नसेल) तर विमानास खचितच नुकसान होतें. त्याचप्रमाणें चारित्र वगैरे सद्‌गुणांनीं रहित किंवा अज्ञानी असे गुरुही जर धर्ममार्गाचे कर्णधार झाले तर निश्चितपणें तोटा हा होणारच.
- विमान चालविणारा पायलट हुशार असला म्हणजे विमानाची सहल उत्तम प्रकारें पूर्ण होते. त्याचप्रमाणें दृष्टिरागास वाढविणाऱ्या नाहीं, पण सन्मार्ग दाखविणाऱ्या सद्‌गुरुंची सद्भाग्यानें भेट झाल्यामुळें जन्ममरणाची वारी संपते आणि आपणास मोक्षप्राप्ति होऊं शकते.
- ज्याप्रमाणें बलूनमध्यें हायड्रोजन वायु भरण्यांत येतो व मग तें वर उडूं लागतें, त्याचप्रमाणें धार्मिक मनुष्याच्या आत्म्यांत गुरु महाराज श्रेष्ठ भावनारूपी वायु भरतात व त्यामुळें तो आपल्या जन्माचें सार्थक करूं शकतो.
- ज्याप्रमाणें लग्न होऊन मुलगी सासरीं गेली म्हणजे तिचें जुनें माहेरचें नातें संपून नवें सासरचें नातें सुरु होतें, त्याचप्रमाणें सम्यक्त्वाची प्राप्ति झाली म्हणजे जीवात्म्याची या जगांतील जुनीं सर्व नातीं संपून जातात नि देव, गुरु व धर्म यांच्या बरोबरचें नवें नातें सुरु होतें. त्यामुळें देव आणि धर्म यांच्याशीं संबंध जोडणाऱ्या गुरु महाराजांबद्दल प्रेम वाढत जातें.

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — 'इच्छकार सूत्रा'चा उपयोग लिहा.

उत्तर — गुरु महाराजांना 'सुखशाता' विचारतांना हें सूत्र म्हटलें जातें. असातावेदनीय (अशांत, अस्वस्थ करणाऱ्या) कर्माचा उदय झाला

असेल अथवा जप-तप करतांना, रात्रीं किंवा दिवसां संयमाचें पालन करते वेळीं कांहीं त्रास झाला असेल किंवा संकटें आलीं असतील, तर त्यांना स्वतःच्या शक्तिनुसार दूर करण्याच्या इच्छेनें — सेवाभक्ति करण्याच्या सद्भावनेनें ह्या सूत्रानें 'सुखशाता' विचारली जाते. शेवटीं सत्पात्रीं दान व्हावें अशा उत्कट भावनेनें अन्नपाणी (मधुकरी) घेण्यास येण्यासाठीं विनंति केली जाते.

**प्रश्न २** — काय हें निमंत्रण फक्त अन्न-पाण्यासाठींच (मधुकरी करितांच) केलें जातें ?

**उत्तर** — 'अन्न-पाणी' असें म्हणण्यांत वस्त्र, पात्र, औषध, स्थान वगैरे सर्व आवश्यक वस्तूंचा समावेश केलेला असतोच असें समजावें.

**प्रश्न ३** — देवसि नि राई हे शब्द काय सुचवितात ? त्यांची वेळ कोणती ?

**उत्तर** — देवसि म्हणजे दिवसासंबंधीं. दुपारचे बारा वाजल्यापासून रात्रीचे बारा वाजेपर्यंत दिवस म्हटला जातो. राई म्हणजे रात्रीसंबंधीं. रात्रीचे बारा वाजल्यापासून दुपारचे बारा वाजेपर्यंत रात्र म्हटली जाते.

**प्रश्न ४** — 'शाता' (अर्थात् 'सुखशाता') कां विचारावी ?

**उत्तर** — कांहीं अशाता (अशांतीचें कारण) असल्यास तिचें निवारण करण्याची सेवा-भक्ति करण्याचा फायदा मिळतो; तर सुखशाता आहे, अशी खुशाली समजल्यानें आनंद होतो. शाता विचारणें हा मुद्दां भक्तीचा एक प्रकारच आहे. गुरुभक्ति सुद्धां मुक्तीचें आकर्षण करते.



# (५) श्री इरियावहियं (प्रायश्चित्त) सूत्र

## अन्वयार्थ

इच्छाकारेण -- आपल्या इच्छेनुसार. संदिसह - आज्ञा करा. भगवन् ! - अहो पूज्य (गुरु महाराज)! इरियावहियं - रस्त्यांतून येण्या-जाण्यामुळें लागलेल्या पापांपासून. पडिक्कमामि ? - मी प्रतिक्रमण करूं ? अर्थात् मी त्या पापांपासून दूर होऊं (मागें सरकूं)? इच्छं - आपली आज्ञा शिरसा धरतो, मान्य करितो. इच्छामि - माझी इच्छा आहे (मी इच्छितो). पडिक्कमिउं - प्रतिक्रमण करण्याची. इरियावहियाए- रस्त्यांत चालतांना झालेल्या. विराहणाए-विराधनेपासून. गमणागमणे- येतां-जातांना. पाणक्कमणे - कोणी प्राणी किंवा जीव-जंतु पायानें अथवा दुसऱ्या कोणत्याही प्रकारानें चेंगरला गेल्यामुळें. बीअक्कमणे - बी-बियाणें पायाखालीं दबलें गेल्यामुळें. हरियक्कमणे - ओली वनस्पति चेंगारली गेल्यामुळें. ओसा - दंव, दहिंवर. उत्तिंग - मुंग्यांचें वारूळ. पणग - शेवाळ. दग - कच्चें किंवा सचित्त पाणी. मट्टी - माती. मक्कडा - आणि कोळ्यांचीं. संताणा - जाळीं. संकमणे - पायानें दाबलीं किंवा चेंगरलीं गेल्यामुळें. जे - ज्या. मे - मी. जीवा - जीवात्म्यांची. विराहिया - विराधाना केली असेल. एगिंदिया - एक इंद्रियवाल्या. बेइंदिया - दोन इंद्रियवाल्या. तेइंदिया - तीन इंद्रियवाल्या. चउरिंदिया - चार इंद्रियवाल्या. पंचिंदिया - आणि पांच इंद्रियवाल्या जीवांना मी. अभिहया - पायानें ठेचलें असेल. वत्तिया - पायानें उडणाऱ्या धुळीनें दाबलें असेल, गुदमारा केला असेल. लेसिया - जमिनीबरोबर चिरडलें असेल. संघाइया - एकत्र केलें असेल. संघट्टिया - स्पर्श केला असेल. परियाविया - परिताप म्हणजे त्रास दिला असेल. किलामिया - थकवून टाकलें (निश्चेष्ट केलें) असेल. उद्दविया - घाबरविलें

असेल किंवा त्रास दिला असेल. **ठाणाओ ठाणं** – एका जागेवरून दुसऱ्या जागेवर. **संकामिया** – सरकविलें असेल. **जीवियाओ** – प्राणांपासून. **ववरोविया** – मुकविलें असेल, मारून टाकलें असेल. **तस्स** – तें. **मिच्छा** – मिथ्या होवो, नष्ट होवो. **मि** – माझें. **दुक्कडं** – दुष्कृत, पाप.

## सूत्रार्थ

**इच्छाकारेण संदिसह भगवान्!** – (गुरु महाराजांना शिष्य विनवितो) अहो पूज्य गुरु महाराज! आपल्या इच्छेप्रमाणें मला आज्ञा करा.

**इरियावहियं पडिक्कमामि?** – रस्त्यांतून येतां-जातांना जीं कांहीं पापें लागलीं त्यांचें मी प्रतिक्रमण करूं? (त्यांपासून मी निवृत्त होऊं? ह्याच्या उत्तरांत गुरु महाराज "पडिक्कमेह" असें सांगतात.)

**इच्छं** – आपली आज्ञा शिरसामान्य आहे.

**इच्छामि पडिक्कमिउं** – मी पापांपासून निवृत्त होण्याची (प्रतिक्रमण करण्याची) इच्छा करतो,

**इरियावहियाए विराहणाए** – रस्त्यांत चालतांना जी कांहीं विराधना झाली असेल तिच्या पासून.

**गमणागमणे** – येतां-जातांना,

**पाणक्कमणे बीअक्कमणे हरियक्कमणे** – कोणी प्राणी किंवा जीव-जंतु पायानें अगर दुसऱ्या कोणत्या ही प्रकारानें चेंगरला गेल्यामुळें, बी-बियाणें पायाखालीं दबलें गेल्यामुळें, ओली वनस्पति चेंगरली गेल्यामुळें,

**ओसा-उत्तिंग-पणग-दग-मट्टी-मक्कडासंताणासंकमणे** — दंव किंवा दहिंवर, मुंग्यांची वारुळें, शेवाळ, कच्चे किंवा सचित्त पाणी, माती आणि कोळ्यांची जाळीं पायानें दाबलीं किंवा चेंगरलीं गेल्यामुळें,

**जे मे जीवा विराहिया** – ज्या जीवात्म्यांची ( कष्टत्रास देऊन ) मी विराधना ( आराधन किंवा आराधना म्हणजे प्रार्थना, पूजा, सत्कार वगैरे करणें. ह्याच्या विरुद्ध अर्थी विराधना शब्दाचा उपयोग करण्यांत येतो. ) केली असेल,

**एगिंदिया बेइंदिया तेइंदिया चउरिंदिया पंचिंदिया** — एक इंद्रियवाले ( स्पर्शेन्द्रियवाले – पृथ्वी, पाणी, अग्नि, विस्तव, वारा, वनस्पति वगैरे ); **दोन** इंद्रियवाले ( स्पर्शेन्द्रिय आणि रसनेंद्रियवाले – शंख, कवड्या, जळू, पोरकिडे ( धान्यांतील भुंगे ), गांडूळ, किडे वगैरे ); **तीन** इंद्रियवाले ( स्पर्शेन्द्रिय, रसनेंद्रिय आणि घ्राणेंद्रियवाले – ढेकूण, मुंग्या, सुंगळे वगैरे ); **चार** इंद्रियवाले ( स्पर्शेंद्रिय, रसनेंद्रिय, घ्राणेंद्रिय आणि चक्षुरिंद्रियवाले – विंचू, भुंगा ( भ्रमर ), माशी, पिसू, डांस, काजवा वगैरे ); **पांच** इंद्रियवाले ( स्पर्शेन्द्रिय, रसनेंद्रिय, घ्राणेंद्रिय, चक्षुरिंद्रिय आणि श्रोत्रेंद्रियवाले – नारकी, तिर्यंच, मनुष्य आणि देव )— ह्या एकेंद्रियापासून पंचेंद्रियांपर्यंत सर्व जीवनांना मी

**अभिहया वत्तिया लेसिया** – समोरून येत असतांना पायानें ठेचलें असेल, पायानें उडणाऱ्या धुळीनें दाबलें असेल–गुदमरा केला असेल, जमिनीवरोवर चिरडलें असेल,

**संघाइया संघट्टिया** – एकमेकांना जवळ-जवळ ( एकत्र ) आणलें असेल किंवा सर्वांना एकत्र केलें असेल, स्पर्श करून त्रास दिला असेल.

**परियाविया किलामिला उद्दविया** – परिताप अर्थात् त्रास दिला असेल, थकवून निश्चेष्ट केलें असेल, वावरविलें असेल किंवा विशिष्ट त्रास दिला ( उपद्रव केला ) असेल,

**ठाणाओ ठाणं संकामिया** – एका जागेवरून दुसऱ्या जागेवर ठेवलें किंवा सरकविलें असेल किंवा

**जीवियाओ ववरोविया** – प्राणापासून मुकविलें असेल अर्थात् मारून टाकलें असेल

पोटांत कळ येतें नि दुखतें; त्याचप्रमाणें आत्म्याला हीं पापरूपीं तीन शल्यें असतात. ह्या तीन शल्यांपैकीं एकही शल्य असलें तरी तें आत्म्यास बोचत राहातें – फार दुःखी करतें म्हणून जोपर्यंत एक सुद्धां शल्य आहे तोपर्यंत आत्मशुद्धि होणें अशक्य आहे. ह्यासाठींच आत्म्यास शल्यरहित करण्याची ह्या सूत्रांत सूचना दिली आहे. शल्यांचा नायनाट झाल्यामुळें सरळपणा किंवा निखालसपणा नांवाचा गुण प्रगट होतो.

**प्रश्न ३** — माया, नियाण नि मिथ्यात्व ह्या तिन्ही शल्यांवर टिपा लिहा.

**उत्तर** — ( १ ) **मयाशल्य** – स्वतः केलेलें पाप लपविण्यासाठीं निखालसपणा सोडून कपट, लबाडी किंवा प्रपंच करणें. ( २ ) **नियाण (निदान) शल्य** – मोक्ष देणाऱ्या धार्मिक क्रियेबद्दल मोक्ष न मागतां ऐहिक सुखांची मागणी करणें. ( ३ ) **मिथ्यात्वशल्य** – कुदेव, कुगुरु नि कुधर्मावर विश्वास ठेवणें. ( ज्यांना केवळज्ञान झालेलें नाहीं ते कुदेव, जे पांच महाव्रतांचें पालन करीत नाहींत ते कुगुरु आणि जो विषयवासनांना वाढवितो नि ज्यांत जीवदयेला थारा नाहीं तो कुधर्म. )



# ( ७ ) श्री अन्नत्थ सूत्र

## अन्वयार्थ

अन्नत्थ— ( इतरया आगारां-अपवादांशिवाय ) अन्यत्र, दुसऱ्या ठिकाणीं ( काउस्सग्ग ध्यान खंडित होतें. ) **ऊससिएणं** – श्वास ( उच्छ्वास ) घेतल्यामुळें. **नीससिएणं** – श्वास ( निःश्वास ) सोडल्यामुळें. **खासिएणं** – खोकला आल्यामुळें. **छीएणं** – शिंक आल्यामुळें. **जंभाइएणं** – जांभई आल्यामुळें. **उड्डुएणं** – ढेकर आल्यामुळें. **वायनिसग्गेणं** – अपानवायु

**उड्डुएणं वायनिसग्गेणं** – ( ६ ) ढेकर किंवा उचकी आल्यामुळें ( ७ ) अपानवायु सुटल्यामुळें ( सरल्यामुळें )

**भमलीए पित्तमुच्छाए** – ( ८ ) चक्कर ( घेरी ) आल्यामुळें ( ९ ) पित्त उसळल्यानें मूर्च्छा आल्यामुळें

**सुहुमेहिं अंगसंचालेहिं सुहुमेहिं खेलसंचालेहिं सुहुमेहिं दिट्ठिसंचालेहिं**– ( १० ) सूक्ष्म मानानें ( उदा.– ज्याप्रमाणें डोळ्याची पापणी हालते. ) शरीर हालल्यामुळें ( ११ ) सूक्ष्म मानानें थुंकी किंवा कफ गिळला गेल्यामुळें ( १२ ) सूक्ष्म मानानें दृष्टि ( डोळे ) हालल्यामुळें

**एवमाइएहिं आगारेहिं** – इत्यादि, वर सांगितलेले हे १२ आगार अपवाद* वगैरेमुळें (जर काउस्सग्गाच्या वेळीं माझें शरीर हालेल तरीही ).

**अभग्गो अविराहिओ हुज्ज मे काउस्सग्गो** – माझें काउस्सग्ग ध्यान अखंडित आणि विराधनेशिवाचें अर्थात् शुद्ध, परिपूर्ण व आराधनेनें युक्त असें होवो.

**जाव अरिहंताणं भगवंताणं नमुक्कारेणं न पारेमि** – जोंपर्यंत मी श्रीअरिहंत देवांना ' नमो अरिहंताणं ' असें म्हणून नमस्कार करून काउस्सग्ग पारणार ( संपविणार ) नाहीं.

**ताव कायं ठाणेणं मोणेणं झाणेणं अप्पाणं वोसिरामि** — तोपर्यंत शरीरास एकाच ठिकाणीं स्थिर करून, मौन धारण करून ( तोंडानें एक सुद्धां शब्द बोलल्याशिवाय ) आणि शुभ ध्यान धरत राहून ( ठोंब्याप्रमाणें विचारशून्य बसून नाहीं ) मी स्वतःला ( अर्थात् काउस्सग्गाशिवायच्या इतर सर्व चंचल वृत्तींना ) वोसिरवितो ( अर्थात् प्रत्येक प्रकारच्या पाप प्रवृत्तींपासून माझ्या अंतरात्म्यास दूर ठेवितो ) किंवा मन, वचन आणि तन यांच्या चंचल वृत्तींना सोडून मी ध्यानांत स्थिर होतो.

* वगैरे शब्दानें [illegible] समजावे.

## भावार्थ

ह्या सूत्रांत काउस्सग्ग करतांना होणाऱ्या (नैसर्गिक) शरीर-धर्मांच्या सुटींचें वर्णन करण्यांत आलें आहे. अशा सुटींना–अपवादांना 'आगार' म्हटलें जातें. साप, अग्नि वगैरेंच्या उपद्रवांचे दुसरे चार आगार मिळविले म्हणजे एकूण १६ आगार होतात. ज्याप्रमाणें मालकाची रजा घेऊन चालू पगारानेंही दोन दिवस गैरहजर राहतां येतें आणि कोणतीही हरकत येत नाहीं, त्याचप्रमाणें येथेंही आगारांची सूट सुरवातीपासूनच मागून घेतल्यानें काउस्सग्ग ध्यान अखंड होऊं शकतें.

## परिमल

- अगदीं एकाग्र मनानें आत्म्यास स्वस्वरूपांत स्थिर करण्याची वेळ म्हणजे काउस्सग्ग—हा झाला त्याचा सोपा, सरळ नि सारांशरूप अर्थ.
- मन, वचन नि शरीर, या तिघांच्या क्रिया (कामें) मनुष्यांत नेहमीं चालतच असतात. झोपेंत सुद्धां ह्या तिघांचीं कामें सुरू असतातच. ह्यांना शुभ ध्यानांत स्थिर करण्याचें प्राथमिक शिक्षण, म्हणून 'काउस्सग्गा' चें विधान आहे.
- योगी होण्याची काउस्सग्ग ही पहिली पायरी आहे.
- शरीरावरील माया-ममता किती कमी झाली, हें पहाण्याचें काउस्सग्ग हें मापकयंत्र आहे. ज्याप्रमाणें मालकाची परवानगी घेतल्याशिवाय त्याच्या घरांत शिरतां येत नाहीं, त्याप्रमाणें येथेंही श्रीअरिहंत देवांना नमस्कार केल्याशिवाय काउस्सग्ग पारतां (संपवितां) येत नाहीं.
- भगवान श्रीमहावीर देवासारखे श्रीतीर्थंकर देवसुद्धां छद्मस्थावस्थेंत असतांना पुष्कळ दीर्घकालपर्यंत काउस्सग्ग ध्यान करीत असत. त्यांचें अनुकरण म्हणून सुद्धां आम्ही नेहमीं काउस्सग्ग ध्यान धरिलें पाहिजे. काउस्सग्ग हें एक अभ्यंतर तप आहे.

❋ जोपर्यंत सिग्नल दिला जात नाहीं तोपर्यंत आगगाडी पुढें जाऊंच शकत नाहीं, त्याचप्रमाणें येथेंही 'नमो अरिहंताणं' असें म्हणून श्रीअरिहंत देवांच्या नमस्काराचें उच्चारण करणार नाहीं तोपर्यंत मी काउस्सग्ग ध्यान धरीत राहीन असें नक्की केलें जातें.

❋ शरीरावरील माया-ममता हळूहळू कमी करण्यासाठीं, शरीरास स्थिर करण्यासाठीं (शरीर-इंद्रिय-निग्रहासाठीं), कांहींही ध्येय नसलेल्या व चंचल अशा मनास काबूंत आणण्यासाठीं आणि एकाग्र चित्तानें ध्यान धरून आत्म्याच्या सुपुप्तावस्थेंत असलेल्या शक्तींना जागृत (सतेज) करण्यासाठीं काउस्सग्ग हें एक सर्वोत्तम साधन आहे.

❋ 'वोसिरामि' ह्या शब्दांतून असा भाव निघतो कीं हे जीवात्म्या! तूं आपले स्वतःचे दोष पाहा, धर्मध्यानांत स्थिर हो आणि दुसऱ्याच्या ठाठेवी दुसऱ्याची निंदा व दुसऱ्याचे उगाचच दोष काढत बसणें – ह्या तिन्ही गोष्टींना अगदीं सोडून दे.

## सरळ प्रश्नोत्तरें

**प्रश्न १** — अन्नत्थ सूत्र कशासाठीं म्हटलें जातें ?

**उत्तर** — काउस्सग्ग ध्यानांत असतांनाही शिंक, जांभई, खोकला किंवा ढेकर वगैरे अपरिहार्य दोष (शरीरधर्म) शरीराकडून होण्याचा संभव असतोच. त्यांना थांबवितां येत नसल्यामुळें आगारांत – अपवादांत (सुटींत) त्यांची मोजणी करण्यांत आली आहे. हें सूत्र अनेक धर्मक्रिया करतांना उपयोगी पडतें. जर हें आगार सूत्र आपण बोललो नाहीं किंवा हें सूत्र म्हणण्याचें विधानच नसतें तर भलें-भक्कम-सुदृढ शरीर नसलेल्या आजच्या (साधारणतः सर्व) मनुष्यांचें काउस्सग्ग ध्यान कधींही अगदीं संपूर्ण शुद्ध होऊं शकलेंच नसतें.

**प्रश्न २** — काउस्सग्ग म्हणजे काय ? एका नवकार मंत्राच्या काउस्सग्गाचें काय फळ मिळतें ?

उत्तर — काउस्सग्ग म्हणजे अमुक एका नक्की केलेल्या वेळेपर्यंत शरीरावरील माया-ममतेचा त्याग करून आत्मध्यानांत तल्लीन होणें. ६८ अक्षराच्या नवकार महामंत्रांत आठ संपदा नि नऊ पदें आहेत. एक पद हें एक श्वासोच्छ्वासप्रमाणाचें आहे. अगदीं शुद्ध भावानें नि विधीनें ९ श्वासोच्छ्वासप्रमाणाच्या नवकार मंत्राचा काउस्सग्ग करणारा पुण्यपुरुष देवगतींत (देवलोकांत) १९,६३,२६७ पल्योपम आयुष्य मिळविण्यासाठीं सुदैवी होतो, असें नवकाराच्या काउस्सग्गाचें भावफळ स्पष्ट सांगितलें आहे. ह्याचप्रमाणें मोठया काउस्सग्गांचीं फळें मोठीं मोठीं (जास्ती जास्ती) समजावीं.

प्रश्न ३ — काउस्सग्गांत दृष्टि कशी ठेवावी ?

उत्तर — काउस्सग्गांत नाकाच्या अग्रभागाकडे अगर स्थापनाजी किंवा देवाच्या मूर्तीकडे दृष्टि ठेवली पाहिजे. सभोंवतीं दृष्टि ठेवल्यानें काउस्सग्ग ध्यान शुद्ध (बरोबर) होऊं शकत नाहीं. नवकार मंत्राच्या काउस्सग्गांत श्रीपरमेष्ठी देवांचें स्मरण, चिंतन आणि त्यांनाच शरण जाणें श्रेष्ठ आहे.

प्रश्न ४ — अन्नत्थ सूत्रांत सांगितलेल्या १२ आगारांशिवाय दुसरे चार आगार कोणते आहेत ?

उत्तर — (१) दिव्याचा उजेड पडल्यामुळें पांघरण्यासाठीं (उजेडानें त्रास होऊं नये म्हणून) वस्त्र (अडोसा म्हणून) घेणें किंवा अग्नीच्या भितीमुळें सरकणें (२) उंदीर, मांजर वगैरे मध्यें आल्यामुळें हालणें (३) चोर किंवा राजाच्या भयामुळें कावरें-बावरें होणें (४) सापाच्या भितीनें किंवा भिंत वगैरे पडल्यानें मागें पुढें होणें—अशा प्रकारें एकूण (१२ + ४ =) १६ आगार शास्त्रांत सांगितले आहेत.

प्रश्न ५ — काउस्सग्गांत त्याग करण्याचे (सोडण्याचे) दोष किती व कोणते ?

उत्तर — काउस्सग्ग ध्यानांत सोडण्याचे १९ दोष आहेत. (१) पाय उंच किंवा वाकडा ठेवणें (२) शरीर हालवीत राहणें (३) खांब वगैरेला टेकणें (४) भिंत वगैरे ठिकाणीं डोकें वगैरे अवयवांना टेकवून आधार घेणें (५) पायाचे अंगठे (पंजे) नि टांचा एकत्र चिकटवून ठेवणें (६) पाय फताडे ठेवणें (७) गुह्य अंगावर वारंवार हात फिरविणें (८) घोड्याच्या लगामाप्रमाणें हातांत चरवळा (चवरी) धरणें (९) फारच लाजिरवाण्याप्रमाणें डोकें अगदीं खालीं घालणें (१०) प्रमाणा–मर्यादेपेक्षां जास्त वर किंवा खालीं कपडे नेसणें (११) डांस – मच्छर वगैरेंच्या त्रासानें किंवा लज्जेमुळें शरीर–छाती वगैरे भाग पांघरूण घेऊन झांकणें (१२) थंडी वगैरे कारणांमुळें सर्वांग अंग झांकून घेणें (१३) संख्या मोजण्यासाठीं बोटें किंवा पापणी हालविणें अथवा नवकारवाली (जपमाळ) फिरविणें (१४) कावळ्याप्रमाणें डोळ्याच्या बाहुल्या फिरविणें (१५) कपडे मळतील ह्या भितीनें त्यांचा गोळा करून त्यांना जपणें (१६) वेड्याप्रमाणें डोकें हालविणें (१७) मुक्याप्रमाणें 'हुं हुं' असा आवाज करणें (१८) आलापक (काउस्सग्गांत मनांत होणारा जप किंवा स्तुतिपाठ) करतांना (दारू) प्यालेल्याप्रमाणें वडवड करणें (१९) माकडाप्रमाणें चंचल होऊन इकडे तिकडे पाहणें किंवा ओठ वाजविणें.



# (८) श्री लोगस्स (नामस्तव) सूत्र

## अन्वयार्थ

लोगस्स – लोकांत, तिन्ही लोकांत राहिलेल्या जीवांत. उज्जोअगरे – उद्योत-ज्ञानप्रकाश करणाऱ्या. धम्म – धर्मरूपी, तित्थयरे –

( जें उद्धार करतें तें तीर्थ ) तीर्थाची स्थापना करणाऱ्या. **जिणे** – राग नि द्वेष ह्या दोन्ही अंतःशत्रूंना जिंकणाऱ्या. **अरिहंते** – आणि ४ घाती कर्मांचा नाश करणाऱ्या श्रीअरिहंत देवांची. **कित्तइस्सं** – मी स्तुति ( कीर्तन, स्तवन ) करीन. **चउवीसं पि** – ह्या अवसर्पिणींत ह्या भरत-क्षेत्रांत झालेल्या चोवीस तीर्थपतींची आणि ( 'पि–अपि' शब्दामुळें ) ऐरवत व महाविदेह क्षेत्रांतील तीर्थपतींची. **केवली** – केवलज्ञानी देवांची ( स्तुति करीन ). **उसभं** – ( १ ) भगवंत ऋषभनाथांना. **अजिअं** – ( २ ) अजितनाथांना. **च** – आणि ( सगळ्या ठिकाणीं हाच अर्थ समजावा ). **वंदे** – मी नमस्कार करतो ( ह्याचा संबंध सगळ्या ठिकाणीं समजावा ). **संभवं** – ( ३ ) संभवनाथांना. **अभिणंदणं** – ( ४ ) अभिनंदनस्वामींना **सुमइं** – ( ५ ) सुमतिनाथांना. **पउमप्पहं** – ( ६ ) पद्मप्रभ जिनदेवांना. **सुपासं** – ( ७ ) सुपार्श्वनाथांना. **जिणं** – राग–द्वेषांना जिंकणाऱ्या श्री केवलज्ञानी देवांना ( सगळ्या ठिकाणीं हाच अर्थ समजावा ). **चंदप्पहं** – ( ८ ) चंद्रप्रभस्वामींना. **सुविहिं** – ( ९ ) सुविधिनाथांना. **पुप्फदंतं** – कीं जे पुष्पदंत प्रभुजी ह्या नांवानें सुद्धां प्रसिद्ध आहेत, त्यांना. **सीअल** – ( १० ) शीतलनाथांना. **सिज्जंस** – ( ११ ) श्रेयांसनाथांना. **वासुपुज्जं** – ( १२ ) वासुपूज्यस्वामींना. **विमलं** – ( १३ ) विमलनाथांना. **अणंतं** – ( १४ ) अनंतनाथांना. **धम्मं** – ( १५ ) धर्मनाथांना. **संतिं** – ( १६ ) शांतिनाथांना. **वंदामि** – मी नमस्कार करतो. **कुंथुं** – ( १७ ) कुंथु-नाथांना. **अरं** – ( १८ ) अरनाथांना. **मल्लि** – ( १९ ) मल्लिनाथांना. **मणिसुव्वयं** – ( २० ) मुनिसुव्रतस्वामींना. **नमि** – ( २१ ) नमिनाथांना. **रिट्ठनेमिं** – ( २२ ) अरिष्टनेमि–नेमिनाथांना. **पासं** – ( २३ ) श्रीपार्श्व-नाथांना. **तह** – त्याचप्रमाणें. **वद्धमाणं** – ( २४ ) श्रीवर्धमान–महावीर-स्वामींना ( मी नमस्कार करतो ). **एवं** – ह्याप्रमाणें. **मए** – मी. **अभिथुआ** – ज्यांची स्तुति केली आहे, असे. **विहुय** – ज्यांनीं दूर केले आहे.

**रयमला** – ( कर्मरूपी ) रज व ( कर्मरूपी ) मळास, असे. **पहीण** – आणि संपूर्णपणें क्षय-नाश केला आहे. **जर** – म्हातारपणाचा नि. **मरणा** – मरणाचा ज्यांनी, असे. **चउवीसं पि** ( भरत क्षेत्रांतील ) २४ आणि ( 'पि–अपि' शब्दामुळें ) ऐरवत व महाविदेह क्षेत्रांतीलही. **जिणवरा** – सामान्य केवलज्ञान्यांमध्यें श्रेष्ठ असे. **तित्थयरा** – श्रीतीर्थंकर देव. **मे** – माझ्यावर. **पसीयंतु** – प्रसन्न होवोत. **कित्तिय** – देव-देवेंद्राकडूनही ज्यांचें स्तवन ( कीर्तन ). **वंदिय** – वंदन आणि. **महिया** – पूजन होतें, असे. **जे ए**–जे हा. **लोगस्स** – लोकांत. **उत्तमा** – उत्तम, श्रेष्ठ. **सिद्धा** – सिद्ध झालेले आहेत, ते मला. **अरुग्ग** – शरीराच्या आरोग्या ( स्वास्थ्या ) सह. **बोहिलाभं** – ( बोहि–बोधि म्हणजे सम्यक्त्व ) सम्यग्दर्शनाची प्राप्ति. **समाहि** – समाधि, मनाची स्वस्थता–शांतता. **वरं** – सर्वश्रेष्ठ अशी. **उत्तमं** – उत्तम. **दिंतु** – देवोत. **चंदेसु** – अनंत चंद्रापेक्षांही. **निम्मलयरा** – अधिक ( जास्त ) निर्मल. **आइच्चेसु** – अनंत सूर्यांपेक्षांही. **अहियं** – जास्त. **पयासयरा** – ( ज्ञान ) प्रकाश करणार. **सागरवर** – मोठयांत मोठा जो स्वयंभूरमण महासमुद्र आहे, त्याच्या समान किंवा त्याच्यापेक्षांही अनंतपटीनें जास्त. **गंभीरा** – गंभीर असे. **सिद्धा** – श्रीसिद्ध देव. **सिद्धिं** – मोक्ष. **मम** – मला. **दिसंतु** – देवोत.

## सूत्रार्थ

**लोगस्स उज्जोअगरे** – लोकांत – तिन्ही भुवनांत उद्योत – (ज्ञान) प्रकाश करणाऱ्या,

**धम्मतित्थयरे जिणे** – धर्मरूपी तीर्थाची ( साधु–साध्वी–श्रावक–श्राविका–रूपी श्री चतुर्विध संघाची ) स्थापना करणाऱ्या आणि राग व द्वेष ह्या दोन महाशत्रूंना जिंकणाऱ्या

**अरिहंते कित्तइस्सं** – श्रीअरिहंत देवांची मी स्तुति ( कीर्तन ) करीन.

**चउवीसं पि केवली** - (भरत क्षेत्रांतील) २४ देवांची नि त्याच-प्रमाणें दुसऱ्याही केवलज्ञानी देवांची (मी स्तुति करीन). [१].

**उसभमजिअं च वंदे** - श्रीऋषभदेव आणि श्रीअजितनाथ प्रभूंना मी वंदन करतो.

**संभवमभिणंदणं च सुमइं च** - श्रीसंभवनाथ, श्रीअभिनंदनस्वामी व श्रीसुमतिनाथ देवांना (मी वंदन करतो).

**पउमप्पहं सुपासं** - श्रीपद्मप्रभजिन, श्रीसुपार्श्वनाथस्वामी

**जिणं च चंदप्पहं वंदे** - आणि राग-द्वेषांस जिंकणारे आठवे तीर्थंकरदेव श्रीचंद्रप्रभ जिनेश्वर ह्यांना मी नमस्कार करतो. [२.]

**सुविहिं च पुप्फदंतं** - ज्यांचें दुसरें नांव श्रीपुष्पदंत प्रभु असेंही आहे अशा श्रीसुविधिनाथांना,

**सीअलसिज्जंसवासुपुज्जं च** - श्रीशीतळनाथ, श्रीश्रेयांसनाथ नि श्रीवासुपूज्यस्वामी देवांना,

**विमलमणंतं च जिणं** - श्रीविमळनाथ, श्रीअनंतनाथ, त्याच प्रमाणें राग-द्वेष वगैरे अंतःशत्रूंना जिंकणाऱ्या

**धम्मं संतिं च वंदामि** - श्रीधर्मनाथ आणि श्रीशांतिनाथ देवांना मी नमस्कार करतो. [३].

**कुंथुं अरं च मल्लिं** - श्रीकुंथुनाथ, श्रीअरनाथ आणि श्रीमल्लिनाथ जिनेश्वर देवांना

**वंदे मुणिसुव्वयं नमिजिणं च** - व श्रीमुनिसुव्रतस्वामी आणि राग-द्वेषांचा नाश करणाऱ्या श्रीनमिनाथ देवांना मी वंदन करतो.

**वंदामि रिट्ठनेमिं** - श्रीनेमिनाथ (श्रीअरिष्टनेमि) देवांना मी नमस्कार करतो.

**पासं तह वद्धमाणं च** - **श्रीपार्श्वनाथस्वामी** भगवंतांना व श्रीमहावीर (वर्धमान) स्वामींना (मी नमस्कार करतो). [४].

भरलेल्या ह्या संसारांत शांति मिळण्यासाठीं आम्हांस समाधीची फार जरूर आहे. (२) धर्म करण्यासाठीं शरीर निरोग असणेंही आवश्यक आहे. (३) २४ तीर्थंकरांच्या स्तुतीचीही गरज आहे, कारण त्यामुळें ते प्रसन्न होतात व आपला सर्व कार्यभाग निमुटपणें पार पडतो.

## सरळ प्रश्नोत्तरें

**प्रश्न १** — लोगस्स सूत्राचें दुसरें नांव काय ? त्यांत काय आहे ?

**उत्तर** — लोगस्साचें दुसरें नांव '**नामस्तव**' आहे. त्यांत श्रीऋषभदेवस्वामीपासून श्रीमहावीरस्वामीपर्यंतच्या २४ तीर्थंकर देवांना नमस्कार केला आहे. ह्या सूत्रांत २४ तीर्थंकर देवांचीं नांवें असल्यानेंच ह्याचें (दुसरें) नांव 'नामस्तव' पडलें.

**प्रश्न २** — एका लोगस्साचा काउस्सग्ग किती श्वासोच्छ्वासाचा करावयाचा असतो ?

**उत्तर** — लोगस्सांत २८ पदें असल्यानें संपूर्ण लोगस्साचा काउस्सग्ग २८ श्वासोच्छ्वासप्रमाणाचा (एक पद = एक श्वासोच्छ्वास) होतो. परंतु कित्येक विशिष्ट प्रसंग सोडून प्रतिक्रमण वगैरे धार्मिक क्रियांत सर्वसामान्यपणें बहुतकरून लोगस्साच्या काउस्सग्गाचें प्रमाण २५ श्वासोच्छ्वासाचें असल्यानें 'चंदेसु निम्मलयरा' पर्यंतच केला जातो, कारण तेथवर २५ पदें होतात.

**प्रश्न ३** — पुष्पदंत, अरिष्टनेमि आणि वर्धमान, हीं कोण-कोणत्या देवांचीं नांवें आहेत ?

**उत्तर** — पुष्पदंत हें श्रीसुविधिनाथांचें, अरिष्टनेमि हें श्रीनेमिनाथांचें व वर्धमान हें श्रीमहावीरस्वामींचें दुसरें नांव आहे.

**प्रश्न ४** — काउस्सग्गांत नवकार वगैरेंचें स्मरण (मानसिक जप) न करतां नुसतें ध्यान केलें तर चालेल किंवा नाहीं ?

उत्तर — मन फार दुष्ट नि चंचळ असल्यामुळें कांहीं शुभ चिंतना-( धार्मिक अवलंबा )शिवाय फक्त मुकाट्यानें व सुंभासारखे बसून राहिल्यानें तें शुभ योगांत ( व्यापारांत, ध्यानांत ) राहील, असें म्हणणें अशक्य आहे; कदाचित् तें वाईट विचारच करील, आणि असें काउस्सग्ग ध्यान कर्मांच्या बंधनांचा नाश करण्यास समर्थ होणार नाहीच नाहीं. म्हणूनच शुद्ध स्थान ( जागेची पवित्रता ) व श्रेष्ठ ( शुभ, उत्तम ) ध्यानपूर्वकच्या मौनासच काउस्सग्ग म्हटलें जातें.



# (९) श्री करेमि भंते ( सामायिक ) सूत्र

## अन्वयार्थ

**करेमि** – मी करतो. **भंते !** – हे भगवंता ! अहो गुरु महाराज ! **सामाइयं** – सामायिक. **सावज्जं** – सावद्य, पापयुक्त. **जोगं** – व्यापारांचा, कृत्यांचा. **पच्चक्खामि** – मी त्याग ( प्रत्याख्यान ) करतो. **जाव** – जोपर्यंत. **नियमं** – नियमाचें. **पज्जुवासामि** – पर्युपासन – चांगल्या-प्रकारें पालन करीत आहे, तोपर्यंत. **दुविहं** – दोन प्रकारांनी. **तिविहेणं** – तीन योगांद्वारा. **मणेणं** – मनानें. **वायाए** – वाणीनें. **काएणं** – आणि शरीरानें. **न करेमि** – करणार नाहीं. **न कारवेमि** – आणि दुसऱ्यांकडून करविणारही नाहीं. **तस्स** – त्या ( पूर्वी केलेल्या पापांपासून ). **भंते !** – हे भगवंता ! अहो गुरु महाराज ! **पडिक्कमामि** – मी प्रतिक्रमण करतो, निवृत्त होतो. **निंदामि** – ( त्या पापकर्मांची ) मी आत्मसाक्षीनें निंदा करतो. **गरिहामि** – गुरु महाराजांना साक्षी ठेवून विशेष निंदा करतो. **अप्पाणं** – आणि पापानें भरलेल्या माझ्या जीवात्म्यास. **वोसिरामि** – वोसिरवितो ( पापांपासून अगदीं वेगळा करतो ).

## सूत्रार्थ

**करेमि भंते ! सामाइयं** – अहो गुरु महाराज ! ज्यांत क्रोध-मान वगैरे कषाय नाहींत व जें समतास्वरूप आहे, असें सामायिक व्रत मी करतो ( घेतो ).

**सावज्जं जोगं पच्चक्खामि** – सावद्य-पापयुक्त व्यापाराचें ( कर्माचें ) मी प्रत्याख्यान करतो अर्थात् ह्या सामायिकांत मी पापकर्मे करणार नाहीं.

**जाव नियमं पज्जुवासामि** – जोपर्यंत मी नियमाचें पालन करीत आहे तोपर्यंत ( दोन घटकेच्या – ४८ मिनिटांच्या – ह्या सामायिकांत )

**दुविहं तिविहेणं** – दोन करणांनीं ( प्रकारांनीं ) आणि तीन योगांनीं ( स्पष्टीकरण खालीलप्रमाणें )

**मणेणं वायाए काएणं** – मनानें, वाणीनें आणि शरीरानें ( ३ योग )

**न करेमि न कारवेमि** – ( सावद्य प्रवृत्ति, पापकर्मे ) स्वतः करणार नाहीं व दुसऱ्यांकडून करविणार ही नाहीं. ( २ करणें – प्रकार ) [ मनानें करणार नाहीं, करविणार नाहीं; वाणीनें करणार नाहीं, करविणार नाहीं आणि शरीरानेंही करणार नाहीं; करविणार नाहीं. ]

**तस्स भंते ! पडिक्कमामि** – हे भगवंता ! अहो गुरु महाराज ! ह्या तीन योगांनीं व दोन करणांनीं पूर्वी मी जीं कांहीं पापें केलीं असतील, त्यांपासून ( तस्स ) मी प्रतिक्रमण करतो ( त्या पापांपासून निवृत्त होतो, मागें–दूर– सरकतो ).

**निंदामि गरिहामि** – त्या पापांची मी आत्मसाक्षीनें निंदा करतो आणि गुरु महाराजांना साक्षी ठेऊन विशेष निंदा करतो. ( गुरु महाराजां-समोर पापें कबूल करून पश्चात्तापपूर्वक तीं पुढें न करण्याची प्रतिज्ञा घेतल्यानें जास्त प्रमाणांत पापकर्मांचा नाश होतो. )

**अप्पाणं वोसिरामि** – आणि माझ्या जीवात्म्यास पापांपासून

देणारा सुद्धां गुन्हेगार आहे आणि पापाचा वांटेकरीही — हा ' कारवेमि 'चा गूढार्थ आहे.

✲ ' करेमि भंते ' हें अहिंसेचें मूळभूत सूत्र आहे.

✲ गुरु महाराजांसमोर पापांचा पश्चात्ताप करणें, हेंच मोक्ष मार्गाकडील खरें-खुरें प्रयाण आहे.

✲ मन, वचन आणि शरीर — ह्या तीन स्वच्छंदतेनें धावणाऱ्या नि अदांत घोड्यांत काबूंत आणण्यासाठीं ' करेमि भंते सूत्र ' हें एक वशीकरण सूत्र ( १ सूत. २ लगाम. )च आहे.

✲ ठुंभासारखे विचारशून्य बनून एकाच ठिकाणीं वसून राहण्यास सामायिक म्हणतां येणार नाहीं. क्रोध, द्वेष, गर्व वगैरेंवर विजय मिळवून, पापकर्म करण्याचें बंद करून, समस्त चराचर जीवमात्रावर समभाव ठेऊन, ' करेमि भंते 'चीं प्रतिज्ञा घेऊन आणि आधि-व्यधि-उपाधींना विसरून जाऊन जें सामायिक केलें जातें, तेंच सर्वश्रेष्ठ-उत्कृष्ट फळ देणारें होतें.

✲ आपल्या हातून कांहीं गुप्त पाप झालें असेल तर तें दुसऱ्याजवळ सांगण्यास सर्व सामान्य मनुष्यास लाज वाटते. ह्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे स्वतःचे दोष गुरु महाराजांजवळ उघड करून सांगणें, हें फारच अवघड काम आहे; पण त्यासही हें सूत्र अगदीं सोपें बनवून देतें.

✲ स्वतःच्या पापास पाप म्हणून कबूल करणाराच खरा धीर आहे. लाज-लज्जा सोडून ( अर्थात् परितापपूर्वक ) गुरु महाराजांजवळ स्वतः केलेल्या पापांबद्दल पश्चात्ताप करण्यांत निखालसपणा आणि मोठ्या मनाची जरूर असते आणि ही जरूर हें सूत्र पूर्ण करतें.

✲ मन, वाणी आणि शरीरास स्थिर करून ( त्यांस आपल्या काबूंत ठेऊन ) समत्वयोगाच्या प्राप्तीच्या मार्गी प्रयाण करणें म्हणजेच सामायिक होय. सामायिक जर ३२ दोषांनीं रहित असें झालें, तरच तें खरें ( यथार्थ ) म्हणता येईल. साधक गृहस्थासाठीं तर तें एक सर्वश्रेष्ठ साधनच आहे. मनाच्या चंचळ वृत्ति सामायिकाच्या ( रोजच्या नियमित ) अभ्यासानें हळू हळू काबूंत येत जातात नि त्यामुळें साधकांना साधनामार्ग सुरक्षित होत जातो.

卐 जितका वेळ सामायिक केलें जातें तितका वेळ संसाराचा त्याग केला, असें म्हणता येईल; अर्थात् तितक्या प्रमाणांत त्यागवृत्तीवर त्याचा अनुराग (प्रेम) झाला, असें अंशतः म्हणता येईल. ज्याप्रमाणें स्वतःचें गांव सोडल्याशिवाय परगांवीं जाता येत नाहीं त्याचप्रमाणें राग (प्रेम) सोडल्याशिवाय वीतरागी कसें होता येईल? रागवृत्तीचा त्याग केल्यानें आपल्यांत समता उत्पन्न होते. रागरहित अशा ह्या सामायिकांत श्रीवीतराग देवांना ओळखण्याचा एक रमणीय अवसर प्राप्त होतो. ह्या सामायिकापासून तर अमेरिका, आफ्रिका वगैरे परदेशांत सुद्धां वारंवार आपलें श्रेय साधता येतें.

## सरळ प्रश्नोत्तरें

**प्रश्न १** – तीन योग आणि दोन करणें कशासाठीं?

**उत्तर** – मन, वचन आणि शरीर – ह्या तीन **योगांनीं** स्वतः (पापकर्मे) न करणें आणि दुसऱ्याकडूनही न करविणें हीं दोन करणें झालीं. पूज्य मुनिराजांकरितां सामायिकाच्या पच्चक्खाणांत (प्रत्याख्यानांत) तीन योग आणि (स्वतः न करणें आणि दुसऱ्याकडून न करविणें – ह्या दोन कारणांबरोबर पापाचें अनुमोदनही न करणें अशीं एकूण) तीन करणें असतात. श्रावकवर्ग दसनवारींत व्याजीं दिलेल्या रकमेचें व्याज किंवा कॉन्ट्राक्टनें बांधलें जाणारें स्वतःचें घर वगैरेंची अनुमति पौषध किंवा उपधानांत सोडूं शकत नाहीं. अर्थात् श्रावक सावद्याच्या अनुमतीचा त्याग करूं शकत नाहींत. म्हणूनच साधु महाराजांकरितां त्रिविध – त्रिविध आणि श्रावकांसाठीं द्विविध – त्रिविध पच्चक्खाण असतें.

**प्रश्न २** – सामायिक उत्तम (श्रेष्ठ) कां मानलें जातें?

**उत्तर** – सामायिकांत कोणत्याही पापप्रवृत्तीला वाव (प्रवेश) नसल्यामुळें तें उत्तम समजलें जातें. पैसे खर्च केल्याशिवाय धर्म करणाऱ्यांनाही हें सामायिक धर्ममार्गांत स्थिर करतें; म्हणून सुद्धां सामायिक सर्वोत्तम

आहे. स्वतः श्रीमहावीरस्वामी देवांनीं तर अत्यंत गरीब अशा (१८ विश्वं दारिद्र्य असलेल्या) **पुणिया श्रावकाच्या सामायिकाची** प्रशंसा केली होती.

**प्रश्न ३** – 'करेमि भंते सूत्रां'त उल्लेखनीय अशा महत्त्वाच्या कोण-कोणत्या गोष्टी आहेत ?

**उत्तर** – 'करेमि भंते सूत्रां'त जास्त महत्त्वाच्या व उल्लेखनीय अशा खालील गोष्टी आहेत. — (१) पापयुक्त कर्मे न करण्याचें विधान (२) दोन घटका (म्हणजे ४८ मिनिटें) पर्यंत एकाच आसनावर समतेंत बसून रहाण्याचें विधान (३) स्वःतप्रमाणेंच दुसऱ्याकडून सुद्धां पाप न करविण्याच्या पुण्याची प्राप्ति (४) पूर्वी केलेल्या (भूतकाळच्या) पाप-कर्मांच्या नाशाचा उपाय — त्या पापकर्मांची निर्भर्त्सना (निंदा) करून मग त्यांबद्दल पश्चात्ताप करणें (निंदा करून पश्चात्ताप करण्याचें शिक्षण) (५) सामायिकाची देणगी — धर्मध्यान – शुक्लध्यानाची चमक, समतेचा आस्वाद आणि आत्म्यांत रमण करण्याच्या अभ्यासाचें (व्यासंगाचें) शिक्षण.

**प्रश्न ४** – 'दुविहं तिविहेणं' म्हणजे काय ?

**उत्तर** – मन, वचन नि शरीर – ह्या तीन योगांनीं (तिविहेणं) मी स्वतः पाप करणार नाहीं व दुसऱ्यांकडून करविणारही नाहीं (दुविहं). अर्थात् मी मनानें पाप करणार नाहीं व करविणार नाहीं, वाणीनें पाप करणार नाहीं व करविणार नाहीं आणि शरीरानें सुद्धां पाप करणार नाहीं व करविणारही नाहीं. अशा प्रकारें २×३ = ६ प्रकारांनीं पापकर्मांवर बंदी घालण्यांत आली आहे.



# ( १० ) श्री समाइयवयजुत्तो सूत्र

## अन्वयार्थ

सामाइय – सामायिक. वय – व्रतानें. जुत्तो – युक्त, सहित. जाव – यावत्, जोपर्यंत. मणे – मन. होइ – असेल, राहील. नियम– नियमानें. संजुत्तो – संयुक्त, प्रतिज्ञाबद्ध. छिन्नइ – छेदतो, क्षय करतो. असुहं – अशुभ. कम्मं – कर्मांचा. सामाइय – सामायिक. जत्तिआ– जितक्या. वारा – वेळा. [ १ ]. सामाइयम्मि – सामायिक. उ – च. कए – केलें जाईल तोपर्यंत( च ). समणो–श्रमण–साधु महाराजां. इव – सारखा. सावओ – श्रावक. हवइ – होतो. जम्हा – ज्या (कारणा)· मुळें. एएण – ह्या. कारणेणं – कारणामुळें. बहुसो – पुष्कळ वेळां. सामाइयं – सामायिक. कुज्जा – ( श्रावकांनीं ) केलें पाहिजे. [ २ ].

## सूत्रार्थ

सामाइयवयजुत्तो – सामायिक व्रत धारण करणारा श्रावक

जाव मणे होइ नियमसंजुत्तो – जोपर्यंत मनानें नियमानें युक्त ( अर्थात ' करेमि भंते सूत्रा'च्या प्रतिज्ञेंत प्रतिबद्ध ) असेल तोपर्यंत

छिन्नइ असुहं कम्मं – स्वतः पूर्वी केलेल्या अशुभ ( पाप ) कर्मांचा क्षय करतो. ( अर्थात् सामायिक म्हणजे दुष्कर्मांचा नायनाट करण्याचा एक मोठा उद्योगच आहे. )

सामाइय जत्तिआ वारा – जितक्या वेळा सामायिक करेल (तितक्या वेळा ). [ १ ].

सामाइयम्मि उ कए – आणि सामायिक केलें जातें तितका वेळच ( म्हणजे श्रावक सामायिक करतो, करत असतो तेव्हांच, दुसऱ्या वेळीं नाहीं· )

४

**समणो इव सावओ हवइ जम्हा** – ज्यामुळें श्रावक साधु महाराजां सारखा होतो, [ ज्यानें १२ ( किंवा एखादें कमी ) व्रतांचा अंगीकार केला असेल, तोच श्रावक होय; फक्त जैन कुळांत जन्मल्यानेंच श्रावक होता येत नाहीं. ]

**एएण कारणेणं** – ह्या कारणामुळें

**वहुसो सामाइयं कुज्जा** – श्रावकांनीं वारंवार, पुष्कळ वेळां सामायिक केलें पाहिजे. [ २ ].

**सामायिक विधिए लीधुं, विधिए पार्युं, विधि करतां जे कोई अविधि हुई होय, ते सवि हुं मन-वचन-कायाए करी मिच्छा मि दुक्कडम् ।**

**१० मनना, १० वचनना, १२ कायाना एवं ३२ दोषमांहे जे कोई दोष लाग्यो होय, ते सवि हुं मन-वचन-कायाए करी मिच्छा मि दुक्कडम् ।**

## भावार्थ

हें सूत्र सामायिक पारते वेळीं ( पुरें करतांना ) म्हटलें जातें. ह्यांत सामायिकाच्या ३२ दोषांचा त्याग करण्यावरोवर वारंवार ( अनेक वेळा ) शुद्ध स्वरूपांत सामायिक करण्यास सांगितलें आहे. सामायिक करते वेळीं श्रावक ( हळू हळू ) साधु महाराजांसारखा होतो — असें जें म्हटलें आहे, त्यामुळें श्रावकांस श्रावक ( गृहस्थ ) असतांना सुद्धां सामायिकामुळें साधु-जीवन जगण्याचें सौभाग्य प्राप्त होतें. हें सूत्र म्हणतांना चरवळा ( चवरी ) किंवा आसनावर उजवा हात टेकला जातो, तो सामायिकाची प्रतिज्ञा पूर्ण झाल्याचें सुचवितो. ह्या सूत्राच्या दोन्ही गाथा ( कडवीं ) १४ पूर्वधर श्रीभद्रबाहुस्वामी महाराजविरचित श्रीआवश्यकनिर्युक्तीमधील आहेत.

अगदीं चंचल असें मन सुद्धां शुभ ( धार्मिक ) प्रवृत्तींत स्थिर करतां येतें. तर मग सामायिक करणाऱ्या पुण्यात्म्याच्या अशुभ ( दुष्ट, पाप ) कर्मांचा अगदीं चुराडा कां होणार नाहीं ?

❈ ह्या जगांत ज्या जीवात्म्यांजवळ सामायिकासारखे मुक्ति मिळविण्याचें साधन नाहीं आणि जे अविरतींत किंवा अव्रती अवस्थेंत ( उन्मत्त झालेले ) आहेत, त्यांना मोक्ष मिळूंच शकत नाहीं. हा भाव 'समणो इव सावओ' मधून निघतो. ह्या वचनांत श्रावकाच्या सामायिकाची( च ) पांच महाव्रतधारी श्रमण–साधु महाराजांबरोबर तुलना अपेक्षित आहे.

❈ पांची परमेष्ठयांत कोणीही सामायिकाशिवायचे नाहीं, अर्थात् पूज्य साधु-साध्वीजी महाराज सुद्धां ह्या सामायिकानेंच मोक्ष मिळविण्यासाठीं प्रयत्न करतात. वारंवार सामायिक केल्यामुळेंच श्रावकांची साधु महाराजां-बरोबर तुलना करण्यांत आली आहे. श्रावक सामायिकाचे मर्मज्ञ रसिक आहेत, तर मुनिराजही सामायिकाचें यथार्थ आचरण करणारे आहेत नि मर्मज्ञ रसिक सुद्धां — येथें एवढीच तुलना समजावी.

## सरळ प्रश्नोत्तरें

**प्रश्न १** — सामायिक पूर्ण करतांना हें सूत्र कां म्हटलें जातें ?

**उत्तर** — 'सामाइयवयजुत्तो सूत्र' म्हणतांना उजवा हात चरवळा ( चवरी ) किंवा आसनावर ठेवला जातो. नंतर स्थापनेचें उत्थापन करतांना जो सरळ (सुपडा ) हाथ धरला जातो, तो स्थापन केलेल्या गुणांना परत घेण्याचें सूचन करतो अर्थात् स्थापनाचार्यांच्या विसर्जन विधीची जणूं ती सूचनाच आहे. म्हणून सामायिक पारतांना ( पूर्ण करतांना ) हें सूत्र म्हटलें जातें.

**प्रश्न २** — सामायिकांत कोण–कोणत्या दोषांचा त्याग करावयाचा असतो ?

**उत्तर** — सामायिकांत मनाचे १०, वाणीचे १० आणि शरीराचे १२

एकूण ३२ दोषांचा त्याग करावयाचा असतो. इतक्या दोषांशिवायचें — विशुद्ध असें सामायिक झालें पाहिजे.

प्रश्न ३ — मनाचे १०, वाणीचे १० व शरीराचे १२ दोष लिहा.

उत्तर — (अ) **मनाचे दहा दोष** –वैऱ्यास पाहून जळणें. (२) अविवेकाचें चिंतन करणें. (३) सूत्रांच्या अर्थाचा विचार न करणें. (४) मनांत उद्वेग धरणें. (५) यश-कीर्तीची इच्छा करणें. (६) विनयाचा त्याग करणें. (७) भयाचा विचार करणें. (८) व्यापाराची चिंता करणें. (९) फळ मिळेल कां नाहीं ? — अशी शंका धरणें. (१०) फळाची इच्छा नक्की करून धर्म करणें. (आ) **वाणीचे दहा दोष** – (१) अपशब्द बोलणें. (२) अरे-तुरे म्हणणें. (३) सावद्य-पापयुक्त आदेश (हुकूम) करणें. (४) बडबड करणें. (५) भांडण करणें. (६) 'या, बसा' म्हणणें. (७) शिव्या देणें. (८) लहान मुलांना खेळविणें (९) विकथा – टगाचच्या गोष्टी करणें. (१०) थट्टा-मस्करी करणें. (इ) **शरीराचे बारा दोष** — (१) अस्थिर आसनावर (अर्थात् अस्थिरतेनें) बसणें. (२) चोऱ्हीं बाजूला पाहणें. (३) सावद्य-पापयुक्त कामें करणें. (४) आळेपिळे देणें. (५) अविनयानें बोलणें. (६) आडोसा घेऊन टेकून बसणें. (७) शरीरावरील मळ काढणें. (८) खाजविणें. (९) पायावर पाय टेवणें. (पायाला अढी घालणें.) (१०) शरीराचे अवयव उघडे करणें. (११) अंग झांकणें. (१२) झोप घेणें.

प्रश्न ४ — काय सामायिकामुळेंच नरदेहाची सार्थकता होते ?

उत्तर — होय, आणि सांगितलें सुद्धां आहे की —

**सामाइय पोसह संठिय, जीवस्स जाइ जो कालो ।**
**सो सफलो बोधव्वो, सेस संसार फल हेउ ॥**

" मनुष्यांचा सामायिक, पौषध (वगैरे धार्मिक कृत्यें) करण्यांत जितका वेळ जातो, तितकाच वेळ सफळ झाला असें समजावें. बाकीचा वेळ तर (जन्म-मरणरूपी) संसारांत भ्रमण करविणारा (भटकविणारा) च आहे." — अशा प्रकारें श्रीतीर्थंकर देवांनींही सामायिकाची फारच महती गाइली आहे.

**प्रश्न ५** — सामायिकाच्या दोन घटका (४८ मिनिटें) च कां नक्की केल्या असतील ?

**उत्तर** — **" अंतमुहुत्ता उ परं जोगुवओगा न संति।" ('उपयोग आंतर्मुहूर्तिकमेव।')** — असें आगमांत वचन आहे. ह्याचा अर्थ असा आहे कीं एक मुहूर्त अर्थात् दोन घटका (४८ मिनिटें) झाल्यानंतर क्रियेचा उपयोग (उद्देश) बदलूनच जातो. म्हणून 'जावनियमं' नें सामायिकाची वेळ दोन घटका (४८ मिनिटें) समजावी.



# (११) श्री जगचिंतामणि (चैत्यवंदन) सूत्र

## अन्वयार्थ

**इच्छाकारेण** — आपल्या इच्छेनुसार. **संदिसह** – आज्ञा द्या. **भगवन् !** – हे भगवंता ! अहो गुरु महाराज ! **चैत्यवंदन** – चैत्यवंदन, जिनवंदन. **करूं** – करूं कां ? (मग गुरु महाराज किंवा कोणी वडील मनुष्य आज्ञा देतात — कर.) **इच्छं** — जशी आपली आज्ञा.

**जगचिंतामणि** – जगांतील भवी किंवा भव्य (अर्थात् दैवी) जीवांच्या मनःकामना पूर्ण करण्यांत चिंतामणि रत्नासमान. **जगनाह** – त्रिलोकाचे स्वामी. **जगगुरु** – समस्त विश्वाचे गुरु (हितकर दिव्य ज्ञानोपदेश देऊन सत्यमार्ग दाखविणारे) **जगरक्खण** – जगाचें संरक्षण

करणारे. **जगबंधव** – जगांतील साही जीवनिकायांच्या – सर्व प्राणीमात्रांच्या बंधूसमान. **जगसत्थवाह** – तिन्ही लोकांच्या जीवमात्राकरितां सार्थवाहासारखे (इष्ट स्थळीं–मोक्षाप्रत घेऊन जाणारे नेता–पुढारी) **जगभावविअक्खण** – जगांतील चराचर जीवांच्या मनांतील भाव जाणण्यांत विचक्षण–फारच कुशल. **अट्ठावयसंठविअरूव** – ज्यांच्या रूपांची (मूर्तीची) अष्टापद पर्वतावर स्थापना केली आहे, असे. **कम्मट्ठविणासण** – ज्यांनी आठी कर्मांचा नाश केला आहे, असे. **चउवीसं पि** – चोवीस सुद्धां. **जिणवर !** – अहो तीर्थंकर देवांनो ! **जयंतु** – आपला जयजयकार असो (होवो). **अप्पडिहयसासण** – अखंडित शासन असणारे, ज्यांच्या शासनास कोणीही प्रतिहत केलें नाहीं म्हणजे हरविलें नाहीं (अर्थात् ज्यांचें शासन शाश्वत आहे), असे. [१]. **कम्मभूमिहिं** – ५ भरत, ५ ऐरवत नि ५ महाविदेहक्षेत्रें, एकूण १५ कर्मभूमींत. **पढम** – वज्रऋषभनाराच नांवाचें पहिलें. **संघयणि** – संघयण (शरीराचा बांधा) असलेले. **उक्कोसय** – उत्कृष्टपणें, जास्तींत जास्त. **सत्तरिसय** – एकशे सत्तर. **जिणवराण** – श्रीजिनेश्वर देव. **विहरंत** – विहार (यात्रा) करणारे. **लब्भइ** – मिळू शकतात. **नवकोडिहिं** – नऊ कोटि. **केवलीण** – केवळ ज्ञानी मुनिराज. **कोडिसहस्सनव** – नऊ हजार कोटि अर्थात् नव्वद अब्ज. **साहु** – साधु महाराज. **गम्मइ** – समजावे, असतात. **संपइ** – संप्रति-सध्यां, वर्तमानसमयीं. **जिणवर वीस** – (श्रीसीमंधरस्वामी वगैरे) वीस जिनेश्वर देव (५ महाविदेहक्षेत्रांत विहार करीत आहेत). **मुणि विहुं कोडिहिं** – दोन कोटि मुनिराज. **वरनाण** – श्रेष्ठ असे केवलज्ञान असलेले. **समणह** – आणि त्यागी असे साधु महाराज. **कोडिसहस्सदुअ** – दोन हजार कोटि अर्थात् वीस अब्ज. हा सर्वांची **थुणिज्जइ** – स्तुति केली जाते. **निच्च** – नित्य, नेहमीं, रोज. **विहाणि** – सकाळीं (उठून). [२]. **जयउ** – जयजयकार असो.

**सामिय !** – हे नाथा ! **रिसह !** – अहो श्रीऋषभदेवस्वामीजी ! सत्तुंजि ( पालिताण्यांत ) महातीर्थ श्रीशत्रुंजय गिरिराजावर. उज्जिंति ( जुनागडांत ) महातीर्थ श्रीगिरनारजीवर. **पहु** – हे प्रभो. **नेमिजिण !** – श्रीनेमिनाथ देवा ! **वीर !** – हे श्रीमहावीरस्वामीजी ! **सच्चउरि** – सत्य ( साचोर ) नगरीच्या. **मंडण** – शोभेची अभिवृद्धि करणाऱ्या. भरु **अच्छहिं** – भडोचमध्यें. **मुणिसुव्वय !** – हे श्रीमुनिसुव्रतस्वामी, **मुहरिपास !** – ( टिंटोई गांवांत असलेल्या ) हे श्रीमुहरिपार्श्वनाथ दे. **दुह** – भक्तवर्गाची दुःखें आणि. **दुरिय** – दुरितें ( पापकर्मे ) **खंडण** – नाश करणाऱ्या. **अवर** – दुसरे. **विदेहिं** – महाविदेहक्षेत्रांतील. **तित्थयरा** – श्रीतीर्थंकर देव. **चिहुं दिसि** – पूर्व वगैरे चार दिशेंत. **विदिसि** – आणि ईशान्य वगैरे चाऱ्ही विदिशेंत ( कोपऱ्यांत ) **जिं के वि** – जे कोणीही. **तीअ** – अतीत ( भूत ) काळ. **अणागय** – अनागत ( भविष्य ) काळ. **संपइ अ** – आणि वर्तमानकाळच्या. **वंदुं** – मी वंदन करतों. **जिण सव्वे वि** – अगदीं सगळ्या जिनेश्वर देवांना. [ ३ ] **सत्ताणवइ** – सत्याण्णव. **सहस्सा** – हजार. **लक्खा छप्पन** – छप्पन लाख. **अट्ठकोडीओ** – आठ कोटि. **बत्तीसय** – बत्तीसशें **बासियाइं** – ब्याऐंशी. **तिअलोए** – देव, मनुष्य आणि पाताळ ह्या तिन्ही लोकांतील. **चेइए** – श्रीजिनेश्वरदेवांच्या चैत्यांना. **वंदे** – मी वंदन करतों. [ ४ ] **पन्नरस** – पंधरा. **कोडि** – कोटि. **सयाइं** – शे ( शंभर ). **कोडी बायाल** – बेचाळीस कोटि. **लक्ख** – लाख. **अडवन्ना** – अठ्ठावन. **छत्तीस** – छत्तीस. **सहस्स** – हजार. **असीइं** – ऐंशी. **सासय** – शाश्वत अशा. **बिंबाइं** – श्रीजिनप्रतिमांना. **पणमामि** – मी डोकें लववून नमस्कार करतों. [ ५ ].

## सूत्रार्थ

**जगचिंतामणि ! जगनाह !** – त्रिभुवनांतील जीवमात्रांच्या ( मुर्ख

(होण्याच्या) मनःकामना परिपूर्ण करण्यांत चिंतामणि रत्नासारख्या हे त्रिभुवनाच्या नाथांनो !

**जगगुरु ! जगरक्खण !** – पंचेंद्रिय जीवांना (दिव्य ज्ञानाचा) उपदेश देऊन त्यांचा उद्धार करणाऱ्या हे गुरुदेवांनो ! अभयदानाच्या अत्यंत चमत्कारिक अशा सूत्रानें साही निकायांच्या जीवांचें रक्षण करणाऱ्या (व) :

**जगबंधव ! जगसत्थवाह !** – (वैर-विरोधास दूर करून विश्वबंधुत्वाचा अमूल्य आणि आदर्शपूर्ण उपदेश देणाऱ्या) हे विश्वबंधूंनो ! मोक्षाभिलाषी लोकांना मोक्षास घेऊन जाणाऱ्या हे सार्थवाहांनो (पुढाऱ्यांनो) (मुक्तिपुरीच्या संघाचे पुढारी संघवी).

**जगभावविअक्खण !** – सहा द्रव्यें, नऊ तत्त्वें वगैरेंचीं गूढ-गूढ रहस्यें समजविण्यांत विचक्षण म्हणजे अत्यंत चकोर नि महाज्ञानी अशा हे देवांनो !

**अट्ठावयसंठविअरूव !** – महाराज भरतानें ज्यांच्या मूर्तींची अष्टापद पर्वतावर स्थापना केली आहे, अशा

**कम्मट्ठविणासण !** – आणि ज्यांनीं ज्ञानावरणीय वगैरे आठी कर्मांचा नाश (करून मोक्ष प्राप्त) केला आहे, अशा;

**चउवीसं पि जिणवर !** – अहो चोविशी श्रीजिनेश्वर देवांनो !

**जयंतु अप्पडिहयसासण !** – ज्यांच्या शासनास कधींही कोणी सुद्धां प्रतिहत करूं शकलें नाहीं अर्थात् हरवूं शकलें नाहीं किंवा निस्तेज करूं शकलें नाहीं अशा (हे जिनेश्वर देवांनो !) आपला सर्वत्र जयजयकार होवो. [१].

**कम्मभूमिहिं कम्मभूमिहिं पढमसंघयणि**– असि, मसि आणि कृषि या तीन प्रकारच्या कर्मांनीं जेथील लोकांची आजीविका चालते, अशा पंधरा कर्मभूमींत पहिला (वज्रऋषभनाराच नांवाचा) शरीराचा बांधा असलेले

**उक्कोसय सत्तरिसय** – उत्कृष्टपणें ( जास्तींत जास्त ) एकशे सत्तर

**जिणवराण विहरंत लब्भइ** – श्रीतीर्थंकर देव विहार ( यात्रा ) करीत असलेले मिळूं शकतात.

**नवकोडिहिं केवलीण** – त्या १७० तीर्थपतींच्या केवळज्ञान्यांचा परिवार नऊ कोटि, आणि

**कोडिसहस्सनव साहु गम्मइ** – सामान्य साधु महाराजांचा परिवार नऊ हजार कोटि ( नव्वद अब्ज ) असतो.

**संपइ जिणवर वीस** – सध्यां–वर्तमान समयीं ( पांच महाविदेह क्षेत्रांत विहार करणारे श्रीसीमंधरस्वामी वगैरे ) वीस तीर्थंकर देव,

**मुणि बिहुं कोडिहिं वरनाण** – दोन कोटि केवळज्ञानी महामुनिराज

**समणह कोडिसहस्सदुअ** – ( आणि ) दोन हजार कोटि ( अर्थात् वीस अब्ज ) सामान्य साधु महाराज — ह्या सर्वांची.

**थुणिज्जइ निच्च विहाणि** – नित्य रोज मंगळ प्रातःकाळीं ( पहाटेच्या सुप्रभातांत ) स्तुति केली जाते. [ २ ].

**जयउ सामिय ! जयउ सामिय ! रिसह ! सत्तुंजि** – हे नाथा ! तुझा ( सर्वत्र ) जयजयकार होवो ! तीर्थाधिराज श्रीशत्रुंजय गिरिराजावरील हे श्रीऋषभनाथ देवा ! तुझा ( सर्वत्र ) जयजयकार होवो !

**उज्जिंति पहु-नेमिजिण !**– श्री गिरनार महातीर्थावरील हे श्रीनेमिनाथ देवा !

**जयउ वीर ! सच्चउरिमंडण !** – आणि सत्यपुरी ( साचोर नगरी )-च्या शोभेची अभिवृद्धि करणाऱ्या चरमतीर्थपति हे श्रीमहावीरस्वामी देवा ! तुमचा ( सर्वत्र ) जयजयकार होवो !

**भरुअच्छहिं मुणिमुव्वय !** – भडोच ( भृगुकच्छ ) नगरीतील हे श्रीमुनिसुव्रतस्वामी देवाधिदेवा ! ( आणि )

**मुहरिपास ! दुहदुरिअखंडण !** – भक्तजनांचीं दुःखें नि दुरितें (पापकर्में) यांचा नायनाट करणाऱ्या (टिटोई गांवांत असलेल्या) हे श्रीपार्श्वनाथ देवा ! (तुमचा सर्वत्र जयजयकार होवो !)

**अवर विदेहिं तित्थयरा** – (तुम्हा सर्वांना त्याचप्रमाणें) दुसऱ्या पांची महाविदेहक्षेत्रांत विहार करणाऱ्या श्रीतीर्थंकर देवांना,

**चिहुं दिसि विदिसि जि के वि** – चाऱ्ही दिशांत नि चाऱ्ही उपदिशांत (कोपऱ्यांत) दुसरें सुद्धां जे कोणी (श्रीतीर्थंकर देव) असतील, त्यांना

**तीआणागयसंपइ अ** – आणि जे भूतकाळीं होऊन गेले आहेत, भविष्यकाळीं होणार आहेत नि वर्तमानकाळीं विद्यमान (विहार करीत) आहेत, अशा

**वंदुं जिण सव्वे वि** – सर्व श्रीतीर्थंकर देवांना मी नमस्कार (वंदन) करतो. [ ३ ].

**सत्ताणवइ सहस्सा** – सत्याण्णव हजार +

**लक्खा छप्पन्न अट्ठकोडीओ** – आठ कोटि छप्पन लाख +

**बत्तीसय बासियाइं** – बत्तीसशे (तीन हजार दोनशे) ब्यांऐंशी = आठ कोटि, सत्तावन लाख, दोनशे ब्यांऐंशी (८,५७,००,२८२)

**तिअलोए चेइए वंदे** – इतक्या (स्वर्ग, मृत्यु नि पाताळ ह्या) तिन्ही लोकांतील श्रीजिन मंदिरांना मी नमस्कार (वंदन) करतो. [ ४ ].

**पन्नरसकोडिसयाइं** – पंधराशे कोटि (पंधरा अब्ज),

**कोडी बायाल लक्ख अडवन्ना** – बेचाळीस कोटि, अठ्ठावन लाख,

**छत्तीस सहस्स असीइं** – छत्तीस हजार, ऐंशी (१५,४२,५८,३६,०८०)

**सासयबिंबाइं पणमामि** – एकंदर इतक्या शाश्वत श्रीजिन मूर्तींना मी नमस्कार (प्रणाम) करतो. [ ५ ].

**उक्कोसय सत्तरिसय** – उत्कृष्टपणें ( जास्तींत जास्त ) एकशे सत्तर

**जिणवराण विहरंत लब्भइ** – श्रीतीर्थंकर देव विहार ( यात्रा ) करीत असलेले मिळूं शकतात.

**नवकोडिहिं केवलीण** – त्या १७० तीर्थपतींच्या केवळज्ञान्यांचा परिवार नऊ कोटि, आणि

**कोडिसहस्सनव साहु गम्मइ** – सामान्य साधु महाराजांचा परिवार नऊ हजार कोटि ( नव्वद अब्ज ) असतो.

**संपइ जिणवर वीस** – सध्यां–वर्तमान समयीं ( पांच महाविदेह क्षेत्रांत विहार करणारे श्रीसीमंधरस्वामी वगैरे ) वीस तीर्थंकर देव,

**मुणि विहुं कोडिहिं वरनाण** – दोन कोटि केवळज्ञानी महामुनिराज

**समणह कोडिसहस्सदुअ** – ( आणि ) दोन हजार कोटि ( अर्थात वीस अब्ज ) सामान्य साधु महाराज — ह्या सर्वांची.

**थुणिज्जइ निच्च विहाणि** – नित्य रोज मंगळ प्रातःकाळीं ( पहाटेच्या सुप्रभातकाळयांत ) स्तुति केली जाते. [ २ ].

**जयउ सामिय ! जयउ सामिय ! रिसह ! सत्तुंजि** – हे नाथा ! तुझा ( सर्वत्र ) जयजयकार होवो ! तीर्थाधिराज श्रीशत्रुंजय गिरिराजावरील हे श्रीऋषभनाथ देवा ! तुझा ( सर्वत्र ) जयजयकार होवो !

**उज्जिंति पहु-नेमिजिण !** – श्री गिरनार महातीर्थावरील हे श्रीनेमिनाथ देवा !

**जयउ वीर ! सच्चउरिमंडण !** – आणि सत्यपुरी ( साचोर नगरी )-च्या शोभेची अभिवृद्धि करणाऱ्या चरमतीर्थपति हे श्रीमहावीरस्वामी देवा ! तुमचा ( सर्वत्र ) जयजयकार होवो !

**भरुअच्छहिं मुणिमुव्वय !** – भडोच ( भृगुकच्छ ) नगरींतील हे श्रीमुनिसुव्रतस्वामी देवाधिदेवा ! ( आणि )

**मुहरिपास ! दुहदुरिअखंडण !** – भक्तजनांचीं दुःखें नि दुरितें (पापकर्में) यांचा नायनाट करणाऱ्या (टिटोई गांवांत असलेल्या) हे श्रीपार्श्वनाथ देवा! (तुमचा सर्वत्र जयजयकार होवो!)

**अवर विदेहिं तित्थयरा** – (तुम्हा सर्वांना त्याचप्रमाणें) दुसऱ्या पांची महाविदेहक्षेत्रांत विहार करणाऱ्या श्रीतीर्थंकर देवांना,

**चिहुं दिसि विदिसि जिं के वि** – चाऱ्ही दिशांत नि चाऱ्ही उपदिशांत (कोपऱ्यांत) दुसरें सुद्धां जे कोणी (श्रीतीर्थंकर देव) असतील, त्यांना

**तीआणागयसंपइ अ** – आणि जे भूतकाळीं होऊन गेले आहेत, भविष्यकाळीं होणार आहेत नि वर्तमानकाळीं विद्यमान (विहार करीत) आहेत, अशा

**वंदुं जिण सव्वे वि** – सर्व श्रीतीर्थंकर देवांना मी नमस्कार (वंदन) करतो. [ ३ ].

**सत्ताणवइ सहस्सा** – सत्याण्णव हजार +

**लक्खा छप्पन्न अट्ठकोडीओ** – आठ कोटि छप्पन लाख +

**बत्तीसय बासियाइं** – बत्तीसशे (तीन हजार दोनशे) ब्याऐंशी = आठ कोटि, सत्तावन लाख, दोनशे ब्याऐंशी (८,५७,००,२८२)

**तिअलोए चेइए वंदे** – इतक्या (स्वर्ग, मृत्यु नि पाताळ या) तिन्ही लोकांतील श्रीजिन मंदिरांना मी नमस्कार (वंदन) करतो. [ ४ ].

**पन्नरसकोडिसयाइं** – पंधराशे कोटि (पंधरा अब्ज),

**कोडी बायाल लक्ख अडवन्ना** – बेचाळीस कोटि, अठ्ठावन लाख,

**छत्तीस सहस्स असीइं** – छत्तीस हजार, ऐंशी (१५,४२,५८,३६,०८०)

**सासयबिंबाइं पणमामि** – एकंदर इतक्या शाश्वत श्रीजिन मूर्तींना मी नमस्कार (प्रणाम) करतो. [ ५ ].

## भावार्थ

गणधर भगवंत श्रीगौतमस्वामी जेव्हां श्रीअष्टापद तीर्थाची यात्रा करण्याकरितां गेले होते, तेव्हां तेथें त्यांनीं हें सूत्र बनविलें, असें म्हणतात. मंदिरांत वंदन अशा प्रकारेंच झालें पाहिजे, असें हें सूत्र शिकवितें. ह्या सूत्राचें दुसरें नांव 'चैत्यवंदन सूत्र' असें आहे. ह्या सूत्रांत पुष्कळशा चैत्यांना (जिनमंदिरांना) वंदन केलें आहे. देवांच्या समोर बसून, डावा गुडघा थोडा (अर्धा) उंच ठेऊन, दोन्ही हातांच्या कोपरांना पोटाजवळ करून व दोन्ही हात कमला-कृति मुद्रेत जोडून चैत्य-वंदन केलें (हें सूत्र म्हटलें) जातें.

## परिमल

- ज्याप्रमाणें दिवसाचे तास २४ पेक्षां जास्त होऊं शकत नाहींत, त्याचप्रमाणें अडीच द्वीपाच्या मनुष्यलोकांत तीर्थंकर देवही १७० पेक्षां केव्हांही जास्त होत नाहींत.
- गणधर देव श्रीगौतमस्वामींची श्रीअष्टपद तीर्थाची ही यात्रा आम्हांस वारंवार मोठमोठ्या तीर्थयात्रा करण्याची प्रेरणा देते.
- उपदेशामुळें गुह्यतत्त्व (खरें ज्ञान) व अभयदानामुळें खरें (वास्तविक) रक्षण— हीं दोन्ही ह्या सूत्राचीं अत्यंत गूढ तत्त्वें आहेत.
- श्रीवीतरागी देवांबरोबर कशा प्रकारें नि कोणकोणत्या गोष्टी कराव्या ! — हें आपणास ह्या सूत्रांतून समजतें.
- 'संपइ' म्हणजे संप्रति (सांप्रत), सध्यां, आतां, वर्तमानकाळीं अर्थात् श्रीमहावीर देवाच्या शासनकालांत. हा 'संपइ' शब्द आम्हांस युग-युगांतराचा प्राचीन इतिहास पाहण्यास प्रेरित करतो. श्रीअजितनाथ देवांच्या वेळीं १७० विजयांत १७० तीर्थंकर देव विहार (संचार) करीत होते-त्या असंख्य वर्षांच्या अतिप्राचीन अतीत (भूत) कालांत डोकावून पहाण्याची ही जणूं कांहीं सूचनाच आहे.
- स्वतःच्या राजाच्या घरीं मुलाचा जन्म झालेला ऐकून (—पाहून) सर्व प्रजाजनांना आनंद होतो नि राजा सर्वांना प्रीतिभोजन देतो, नंतर तो

राजपुत्र शिकून-सवरल्यावर, राज्यकारभारांत तरबेज झाल्यावर राजा त्याला गादीवर बसवितो, तेव्हां तो शोभूं लागतो. त्याचप्रमाणें श्रीजिन-मूर्तीचा अंजनशलाका महोत्सव होतो, त्यावेळीं प्रथम मूर्तीची प्राण-प्रतिष्ठा होते नि मग चैत्यांत ( मंदिरांत ) देवस्थानावर स्थान-प्रतिष्ठा केली जाते, तेव्हां देव आपल्या वैभवानें-सामर्थ्यानें तेथें शोभूं लागतात. अशा देवांपुढें वंदन, स्तुति, भजन वगैरे केलें जातें, त्यास चैत्यवंदन असें म्हणतात.

❖ (१) श्रीजिन मंदिरें हीं असलींच पाहिजेत. (२) देवांच्या मूर्तीसमोर भक्ति ही केलीच पाहिजे. (३) ही वंदन-स्तवनरूपी भक्तिसुद्धां मुक्तीच्या साधनेचा एक प्रकारच आहे— ह्या तीन गोष्टी ह्या सूत्रांतून आपणास शिकायास मिळतात.

❖ प्रत्येक महाविदेह क्षेत्रांत ३२ आणि प्रत्येक भरत नि ऐरवत क्षेत्रांत १-१ विजय असते, म्हणून पंधरा कर्मभूमींत [ पांच महाविदेह क्षेत्रांच्या (५ × ३२ =) १६० + पांच भरत क्षेत्रांच्या (५ × १ =) ५ + पांच ऐरवत क्षेत्रांच्या (५ × १ =) ५ ] एकूण १७० विजया झाल्या. श्री केवलज्ञानी देवांनीं इतका विशाल विस्तार तर मनुष्यांच्या जगतांचाच पाहिला नि सांगितला आहे; ह्या ( मनुष्यवस्ती ) शिवायचें जग तर परार्धों ( अनंत ) योजनांनीं सांगितलें आहे.

❖ शाश्वत जिनबिंब नि शाश्वत चैत्यें ( जिन मंदिरें ) आहेत, ह्या गोष्टीची साक्षी ह्या सूत्रांत सूत्रकार स्वतः श्रीगणधर देव करविताहेत. त्रिभुवनांतील शाश्वत जिनमूर्तींची इतकी सूक्ष्म मोजणी केवलज्ञान्यांवाचून दुसरा कोण करूं शकणार ? येथें बसल्या बसल्या त्या प्रत्येक मूर्तीला नमस्कार करून पुण्य संपादन करण्याची ह्या सूत्रांत सूचना आहे.

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — जगचिंतामणि सूत्र काय आहे ? तें कोणीं बनविलें ? नि कां ?

उत्तर — जगचिंतामणि सूत्र चैत्यवंदन आहे. गणधर श्रीगौतमस्वामी महाराज श्रीअष्टापद तीर्थाची यात्रा करण्यासाठीं गेले होते, तेव्हां देवांना

आळविण्यासाठीं त्यांनीं हें सूत्र बनविलें. त्रिभुवनांतील शाश्वत नि अशाश्वत श्रीजिन मंदिरें आणि त्यांत असलेल्या श्रीजिनेश्वर देवांच्या मूर्तींना ह्या सूत्रांत नमस्कार केला गेला आहे.

**प्रश्न २** — श्रीअष्टापद पर्वतावरील श्रीजिनमूर्तींविषयीं तुम्हास काय ठाऊक आहे ?

**उत्तर** — चक्रवर्ती श्रीभरत महाराजांनीं चोविशी श्रीतीर्थंकर देवांच्या मणि नि रत्नांनीं बनविलेल्या मूर्ति श्रीअष्टापद पर्वतावर स्थापन केल्या आहेत. ह्या मूर्तींतील प्रत्येक मूर्ति प्रत्येक तीर्थंकराच्या आकार, प्रकार नि प्रमाणाची असून ( पूर्वेपासून ) चारी दिशांना अनुक्रमें २, ४, ८ नि १० ( एकूण २४ ) अशा आहेत. प्रत्येक देवाची नासिका एका सरळ ओळींत टेऊन उंच-नीच आसनावर ( गादीवर ) मूर्तींची स्थापना केली गेली आहे.

**प्रश्न ३** — तिन्ही लोकांचीं नांवें द्या.

**उत्तर** — ( १ ) स्वर्गलोक, ऊर्ध्वलोक किंवा देव लोक ( २ ) मृत्यु लोक, तिर्च्छालोक किंवा मनुष्यलोक ( ३ ) पाताळ किंवा अधोलोक.

**प्रश्न ४** — ' कम्मभूमिहिं ' म्हणजे काय ?

**उत्तर** — **असि** – तलवार ( अनेक प्रकारचीं आयुधें, ) **मसि**–शाई ( लिहिण्या–वाचण्याचीं सर्व साधनें ) आणि **कृषि** – शेती ( शेती, बाग–बगाईत, गोपालन, व्यापार वगैरे ) — ह्या तीन साधनांच्या विविध प्रकारानें जेथें जीवननिर्वाह केला जातो, ती ' **कर्मभूमि** ' होय.

**प्रश्न ५** — कर्मभूमीच्या क्षेत्रांचीं नांवें सांगून तीं कोठें आलीं आहेत, तेंही सांगा.

**उत्तर** — भरत, ऐरवत व महाविदेह ह्या तीन नांवांचीं पांच-पांच ( ३ × ५ = १५ ) क्षेत्रें आहेत. त्यांपैकीं जंबुद्वीपांत प्रत्येक नांवाचें एक-एक ( म्हणजे एकूण ३ ) आणि धातकीखंड व पुष्करार्धद्वीप ह्या दोन्हींत प्रत्येक नांवाचीं दोन-दोन ( अर्थात् एकूण ६ + ६ = १२ ) — अशा प्रकारें कर्मभूमीचीं क्षेत्रें १५ आहेत. ( अभिप्राय पाच अढीच द्वीपांत ३०

अकर्मभूमि क्षेत्रेंही आहेत. तेथें फक्त जोडींच आनंदानें विहार करीत असतात.)

प्रश्न ६ — जगचिंतामणि सूत्राच्या पांची गाथांचें (कडव्यांचें) संक्षिप्त सार (वर्णन) लिहा.

उत्तर — प्रथम गाथा (कडवें) 'रोला' मध्यें व नंतरच्या गाथा 'वस्तु छंदां'त आहेत. पहिल्या गाथेंत श्रीअष्टापद पर्वतावरील चोवीसां श्रीतीर्थंकर देवांना नमस्कार केला गेला आहे. दुसऱ्या गाथेंत उत्कृष्ट कालीं विहार करणाऱ्या १७० आणि सध्यां जघन्य (कनिष्ठ) पणानें विहार करणाऱ्या २० श्रीतीर्थंकर देवांना नि त्यांच्या परिवारास वंदन केलें गेलें आहे. तिसऱ्या गाथेंत नांव नि स्थानाचा निर्देश करून (आपल्या इष्ट) पांच देवांना आणि तिन्ही काळच्या प्रसिद्ध किंवा अप्रसिद्ध देवांना नमस्कार केला गेला आहे. चौथ्या गाथेंत तिन्ही लोकांतील शाश्वत जिन-मंदिरांना व पांचव्या गाथेंत त्रिभुवनांतील शाश्वत जिनमूर्तींना वंदन केलें गेलें आहे.

प्रश्न ७ — श्रीअष्टापद तीर्थ कोठें आलें आहे? काय तें फारच उंच आहे?

उत्तर — हिमालयाच्या कैलास शिखरावर श्रीअष्टापद तीर्थ आलेलें आहे, असें शास्त्रकारांचें म्हणणें आहे. तें फारच उंचावर आहे, त्याला आठ पायऱ्या आहेत. स्वर्गांतील देव-देवी तेथें श्रीतीर्थंकर देवांची पूजा-भक्ति करितात. तेथें लब्धिधर व चरम शरीर धारण करणाऱ्यांशिवाय कोणीही जाऊं शकत नाहीं.

प्रश्न ८ — श्रीगौतमस्वामी गणधरांनीं श्रीअष्टापद तीर्थाची यात्रा केली, तर मग आम्ही कां करूं शकणार नाहीं?

उत्तर — श्रीगौतमस्वामी गणधर अनंतलब्धिनिधान होते; श्रीअष्टापद तीर्थाच्या यात्रेच्या वेळीं त्यांनीं आपल्या लब्धिबलानें सूर्याच्या किरणांना

पकडून त्यांच्या साहाय्यानें यात्रा पूर्ण केली. त्या काळीं सुद्धां दुसरें ( यात्रिकरू ) तपस्वी महाराज तर त्या पर्वतावर चढूंच शकले नाहींत. आपल्या जवळ तशा प्रकारच्या सिद्धि नसल्यामुळें आपण श्रीअष्टापद तीर्थाची यात्रा करूं शकत नाहीं.

**प्रश्न ९** — काय मुर्तीला नमस्कार ( वंदन ) केल्यानें फायदा होतो ?

**उत्तर** — हो, हो; पुष्कळच फायदा होतो. ' आम्ही सजीव आहोत, तर मग निर्जीव अशा दगडाला नमस्कार काय म्हणून करावा ? ' असें म्हणणाऱ्या प्रत्येक पंथाचे लोक सुद्धां अमुक एका विशिष्ट आकार-प्रकारच्या फोटोस, चित्रास अथवा लाकडाच्या किंवा दगडाच्या मूर्तीस नमस्कार करतात, तिला मानतात आणि स्वःतला फायदा होत आहे असें पाहून तिची भक्ति ( तिच्या समोर भजन-कीर्तन ) ही करतात. जगांतील रुपाया किंवा शंभराची नोट सुद्धां काय निर्जीव ( जड ) नसते ? औषध सुद्धां निर्जीव ( जड ) च असतें ना ? मग तें घेतल्यानें शरीरांतील रोग कसा नाहींसा होतो ? त्याचप्रमाणें देवाच्या मूर्तीची ( नमस्कार, दर्शन, वंदन, भजन वगैरे करून ) आराधना-भक्ति केल्यामुळें दुर्गतीचा नाश होतो. डाग-डागिने, घर-दार, सोनें-चांदी, जड-जवाहीर वगैरे निर्जीवा ( जडा ) ची ही किंमत ( प्रभाव ) असतेच. श्रीवीतरागी देवाची मूर्ति तर आम्हांस वीतरागी होण्याची प्रेरणा ( किंवा शिक्षण ) देते; तर मग तिचें महत्त्व-मूल्य केवढें मोठें ठरविलें ( केलें ) पाहिजे ? श्रीजिनेश्वर देवांची मूर्ति आज जर आपल्या समोर नसती, तर आपणास मुक्तदशा किंवा वीतरागी अवस्थेचें प्रत्यक्ष दर्शन कोणी करविलें असतें ? दृष्टान्त-एखादा गोड पदार्थ ( मिठाई ) पाहातांक्षणींच लहान मुलांच्या तोंडाला पाणी सुटतें, त्याचप्रमाणें वैराग्य-मग्न श्रीवीतरागी देवांच्या मूर्तीचें दर्शन होतांक्षणींच वैराग्य ( ज्ञान )-पिपासु साधकाच्या अंतःकरणांत वैराग्य उत्पन्न होतें. काय मूर्तीपासून होणारा हा फायदा कमी आहे ? म्हणूनच कल्याणाची प्राप्ति करून देणारी देवाधिदेव श्रीजिनेश्वर देवांची मूर्ति नौकेप्रमाणें ( अथवा मोठया जहाज-

प्रमाणें ) ह्या भवसागराच्या पैलतिरीं घेऊन जाणारीच आहे. रागयाची ( संसारांत अनुरागी असलेल्याची ) मूर्ति मोक्ष देऊं शकत नाहीं; स्त्री, त्रिशूल वगैरे बरोबर असलेली मूर्ति राग-द्वेष-दर्शक असल्यानें तिच्यांत मोक्ष देण्याचें सामर्थ्य असूंच शकत नाहीं. श्रीजिनेश्वर देवांची मूर्ति वीत-रागी अवस्थेचें द्योतक असल्यानें तारणारी नि पूज्यच आहे.



# (१२) श्री जं किंचि सूत्र

## अन्वयार्थ

**जं किंचि** – जीं कोणी, जितकीं सर्व. **नामतित्थं** – नामतीर्थे. **सग्गे** – स्वर्ग लोकांत. **पायालि** – ( ह्या पृथ्वीच्या खालीं ) पाताळांत. **माणुस्से लोए** – ( आणि ह्या ) मनुष्य लोकांत. **जाइं** – ज्या ज्या किंवा जितक्या जितक्या. **जिण** – श्रीजिनेश्वर देवांच्या. **बिंबाइं** – मूर्ति ( असतील ). **ताइं** – त्या किंवा तितक्या. **सव्वाइं** – सर्व ( मूर्तींना ) **वंदामि** – मी नमस्कार ( वंदन ) करतो.

## सूत्रार्थ

**जं किंचि नामतित्थं** – जीं जीं नामतीर्थे ( उदाहरणार्थ – श्रीशत्रुंजय तीर्थ. तीर्थें चार प्रकारचीं आहेत – १ नामतीर्थ. २ स्थापनातीर्थ. ३ द्रव्यतीर्थ. ४ भावतीर्थ. ह्यांत नामतीर्थ प्रथम आहे. )

**सग्गे पायालि माणुस्से लोए** – स्वर्ग, पाताळ आणि मनुष्य ह्या तीन लोकांत असतील ( आणि त्या तीर्थांत )

**जाइं जिणबिंबाइं** – श्रीजिनेश्वर देवांच्या ज्या ज्या ( जितक्या असतील तितक्या सर्व ) लहान मोठ्या मूर्ति असतील,

**ताइं सव्वाइं वंदामि** – त्या सर्वांना ( नामतीर्थांना नि त्यांतील भव्य जिनमूर्तींना ) मी भक्ति-भावानें नमस्कार ( वंदन ) करतो.

## भावार्थ

स्वर्ग ( ऊर्ध्व ), पाताळ ( अधो ) आणि मृत्यु ( मध्य ) — ह्या तिन्ही लोकांत जीं जीं तीर्थस्थानें आहेत आणि त्यां तीर्थांत श्रीजिनेश्वर देवांच्या जितक्या म्हणून प्रतिमा आहेत, त्या सर्वांना ह्या सूत्रानें नमस्कार ( वंदन ) केला जातो. तीर्थयात्रा वारंवार केल्या पाहिजेत, हें तत्त्व ह्या सूत्रामुळें स्पष्ट होतें. गांवातल्या ( स्थानिक ) मंदिरांपेक्षां तीर्थभुमींतील मंदिरांत विशेष फायदा ( आत्मोन्नति ) होतो, हें ज्ञानही आपणास ह्या सूत्रामुळेंच होतें.

## परिमल

- स्वर्गांत आणि त्याचप्रमाणें पाताळांतसुद्धां तीर्थें आणि श्रीजिनेश्वर देवांच्या मूर्ति आहेत, असें ह्या सूत्रांमुळें आपणास समजूं शकतें.
- समकिती जीवात्म्याचें देव आणि गुरुशीं नातें जोडलें जात असल्यामुळें तो नेहमींच तीर्थांचें स्मरण नि स्तवन ( स्तुतिपाठ ) करीत असतो.
- जेथें मृत्युलोकांतीलच सर्व तीर्थयात्रा-सर्व जिनमूर्तींचें दर्शन आपण करूं शकत नाहीं, तेथें पाताळ किंवा स्वर्गांतील यात्रांची गोष्ट काय करणार ? परंतु तेथील जिनमूर्तींना नमस्कार ( वंदन ) करून पुण्य पदरीं बांधण्याचें काम ह्या सूत्रामुळें होतें.
- मोठमोठ्या तीर्थस्थानांचें स्मरण करून व तेथील भव्य जिनमूर्तींना नमस्कार ( वंदन ) करून घरीं बसल्या बसल्याच तीर्थयात्रेचें पुण्य पदरीं पाडण्याचें शिक्षण हें सूत्र आम्हांस देतें.

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — ' जं किंचि ' सूत्राचा भावार्थ लिहा.

उत्तर — त्रिभुवनांतील समस्त नामतीर्थें आणि तेथील जिनमूर्तींना ह्या

सूत्रानें नमस्कार (वंदन) केला जातो. ह्या सूत्राद्वारें सर्व नामतीर्थे व तेथील मूर्तींना नमस्कार (वंदन) केल्यानें तीर्थयात्रेइतकेंच पुण्य मिळत असल्यामुळें कधीं क्वचित् महा आळश्यासही हें सूत्र म्हणण्याचें मन होऊं शकतें, म्हणून हें सूत्र फारच महत्त्वाचें आहे.

प्रश्न २ — तीर्थवंदना सारखाच 'जं किंचि'चा हेतु आहे काय ?

उत्तर — होय, ह्या सूत्रानें सुद्धां येथें – घरीं बसल्या बसल्याच अत्यंत दूरदूरवर असलेल्या तीर्थांचें स्मरण करून त्यांना नमस्कार केला जातो. हेंही एक प्रकारचें तीर्थवंदनच होय. हें तीर्थवंदन अगदीं संक्षेपांत होत असल्यानें थोडक्यांत बराच फायदा होतो. पत्रांत सविस्तर लिहिलें जातें, पण तार मोजक्या शब्दांतच करावी लागते; त्याचप्रमाणें हें तारेसारखें संक्षिप्त (सारांशरूप) सूत्र आहे.



# (१३) श्री नमुत्थु णं (शक्रस्तव) सूत्र

## अन्वयार्थ

**नमुत्थु णं** – माझा नमस्कार असो. **अरिहंताणं** – श्रीअरिहंत. **भगवंताणं** – देवांना. [ १ ] **आइगराणं** – पुनः (नव्यानें) श्रीचतुर्विध संघाची स्थापना करून शासनाचा प्रारंभ (आदि) करणाऱ्या. **तित्थ-यराणं** – श्रीतीर्थंकर देवांना. **सयं** – जे स्वतःच. **संबुद्धाणं** – संबुद्ध, सर्वज्ञानी झाले आहेत, त्यांना. [ २ ]. **पुरिस** – पुरुषांत. **उत्तमाणं** – उत्तम, श्रेष्ठ अशांना. **पुरिससीहाणं** – पुरुषांत सिंहासारखे (पराक्रमी) असणाऱ्यांना. **पुरिस-वरपुंडरीआणं** – पुरुषांत, श्रेष्ठ अशा पुंडरीका-(श्वेत कमळा)सारखे उत्तम असणाऱ्यांना. **पुरिस-वरगंधहत्थीणं** – (हत्तींत ज्याप्रमाणें गंधहस्ती श्रेष्ठ मानला जातो त्याचप्रमाणें) पुरुषांत

श्रेष्ठ अशा गंधहस्तीप्रमाणें उत्तम असणाऱ्यांना. [ ३ ]. **लोगुत्तमाणं** – त्रैलोक्यांत सर्वोत्तम असणाऱ्यांना. **लोगनाहाणं** – त्रिलोकाच्या नाथांना. **लोगहियाणं** – लोकांचें ( भवी जीवांचें ) कल्याण करणाऱ्यांना. **लोगपइवाणं** – विश्वांत जे प्रदीप– ज्ञानदीपासारखे आहेत, त्यांना. **लोगपज्जोअगराणं** – सगळ्या जगांत प्रद्योत – ज्ञानप्रकाश करणाऱ्यांना. [ ४ ]. **अभयदयाणं** – अभयदान देणाऱ्यांना ( अभयदान देऊन खरेंखुरें जीवन प्रदान करणाऱ्यांना. ) **चक्खुदयाणं** – विवेकरूपी डोळे देणाऱ्यांना. **मग्गदयाणं** – मुक्तिमार्ग दाखविणाऱ्यांना. **सरणदयाणं** – शरण – आश्रय देणाऱ्यांना. **बोहिदयाणं** – बोधि–सम्यक्त्वरूपी रत्न देणाऱ्यांना. [ ५ ]. **धम्मदयाणं** – धर्माची प्राप्ति करविणाऱ्यांना, धर्ममार्गांत स्थिर करणाऱ्यांना. **धम्मदेसयाणं** – धर्माचा उपदेश करणाऱ्यांना. **धम्मनायगाणं** – धर्माच्या नायकांना, स्थापकांना, पुढाऱ्यांना. **धम्मसारहीणं** – धर्मरूपी रथ चालविणाऱ्या सारथींना. **धम्मवर** – धर्मरूपी श्रेष्ठ. **चाउरंत** – आणि चाऱ्ही गतींचा नाश ( अंत ) करणारें जें धर्मचक्र आहे, त्या धर्मचक्रास धारण करणाऱ्या. **चक्कवट्टीणं** – सर्व धर्मचक्रवर्ती देवांना. [ ६ ]. **अप्पडिहय** – सर्वत्र अप्रतिहत–अस्खलित असें. **वरनाण** – श्रेष्ठ ज्ञान. **दंसण** – आणि दर्शन. **धराणं** – धारण करणाऱ्यांना ( अर्थात् ज्यांना झालेलें आहे अशांना ) **वियट्ट** – अगदीं नायनाट झाला आहे. **छउमाणं** – ज्यांच्या छद्मस्थावस्थेचा, अशांना. ( केवलज्ञान होण्यापूर्वीची स्थिति म्हणजे छद्मस्थावस्था. ) [ ७ ]. **जिणाणं** – ज्यांनीं स्वतः राग आणि द्वेष–ह्या दोन अंतःशत्रूंना जिंकलें आहे, अशांना. **जावयाणं** – जे दुसऱ्यांना ( स्वतःच्या भक्तांना ) रागद्वेषरूपी शत्रूंवर जय मिळवून देतात, त्यांना. **तिन्नाणं** – स्वतः संसारसमुद्र तरून ( पैलतिरीं ) गेलेल्यांना. **तारयाणं** – दुसऱ्यांना संसारसमुद्रापासून तारणाऱ्यांना. **बुद्धाणं** – स्वतः बुद्ध-ज्ञानी असलेल्यांना. **बोहयाणं** – दुसऱ्या भवी जीवांना बोध करणाऱ्यांना. **मुत्ताणं** – घाती नि अघाती कर्मांच्या बंधनापासून मुक्त झालेल्यांना. **मोअगाणं** – दुसऱ्या लोकमां

जीवांना त्या कर्मबंधनांपासून सोडविणाऱ्यांना. [ ८ ]. सव्वन्नूणं - केवलज्ञानी देवांना. सव्वदरिसीणं - ( केवलदर्शन नावांचा गु[illegible] झाल्यामुळें ) सर्वच पाहूं शकणाऱ्यांना. सिवं - कल्याणमय, जेथें [illegible] म्हणून नाहींच अशा. अयलं - अचल, स्थिर. अरुअं - रो[illegible] अणंतं - अनंत, अंताशिवायच्या. अक्खयं - अक्षय, ज्याचा कधीं [illegible] होत नाहीं अशा. अव्वाबाहं - व्याबाधा अर्थात् पिडेशिवायच्या. अ[illegible] वित्ति - जेथून पुनः या पृथ्वीवर येऊन जन्म घ्यावा लागत नाहीं [illegible] सिद्धिगइ - सिद्धिगति-मोक्षगति, मुक्ति. नामधेयं - नांवाच्या. [illegible] ठिकाणीं. संपत्ताणं - पोहोंचले आहे अशा. नमो जिणाणं - श्री[illegible] देवांना माझा नमस्कार असो. जिअभयाणं - सर्व भयांवर ज्यां[illegible] प्राप्त केला आहे अशा. [ ९ ]. जे अ - आणि जे. अईआ - भू[illegible] सिद्धा - श्रीसिद्ध देव होऊन गेले आहेत. जे अ - आणि जे. [illegible] स्संति - होतील. अणागए काले - अनागत-भविष्यकाळीं. [illegible] अ - आणि जे सांप्रतकाळीं, सध्यां वट्टमाणा - ( महाविदेह [illegible] विहार ( संचार ) करीत आहेत. सव्वे - त्या सर्वांना. तिविहेण - [illegible] वाणी नि शरीरानें ) त्रिविध, तिन्ही प्रकारें. वंदामि - मी न[illegible] ( वंदन ) करतो. [ १० ].

## सूत्रार्थ

नमुत्थु णं अरिहंताणं भगवंताणं - श्रीअरिहंत देवांना मा[illegible] स्कार असो. [ १ ].

आइगराणं तित्थयराणं सयं संबुद्धाणं - शासनाची स्थापना [illegible] ( स्वतःच्या [illegible] ) धर्माची सुरवात करणाऱ्यांना, तीर्थंकर [illegible] धर्म धारण करणाऱ्यांना आणि जे स्वतःच शुद्ध-बुद्ध [illegible] झाले [illegible] अशा देवांना ( माझा नमस्कार असो ). [ २ ].

पुरिसुत्तमाणं पुरिससीहाणं - [illegible]

प्रमाणें ( प्रतापी ) असणाऱ्यांना,

**पुरिसवरपुंडरीआणं पुरिसवरगंधहत्थीणं** – पुरुषांत उत्तम अशा पुंडरीक–श्वेत कमळासमान सर्वोत्कृष्टांना ( आणि ज्याप्रमाणें हत्तींत गंधहस्ती श्रेष्ठ मानला जातो त्याप्रमाणें ) पुरुषांत सर्वोत्तम अशा गंधहस्तीप्रमाणें श्रेष्ठ असणाऱ्यांना ( माझा नमस्कार असो ). [ ३ ].

**लोगुत्तमाणं लोगनाहाणं लोगहियाणं** – त्रैलोक्यांत सर्वोत्तम म्हणून सुप्रसिद्ध झालेल्या, अनाथ आणि असहाय अशा लोकांच्या डोक्यावर ज्यांचें छत्र आहे अर्थात् त्यांचे जे नाथ, मालक ( स्वामी किंवा इष्ट–मित्र सर्व ) आहेत अशा, जीवमात्राचे हित ( कल्याण ) इच्छणाऱ्या नि करणाऱ्या,

**लोगपइवाणं लोगपज्जोअगराणं** – लोकांत प्रदीप–ज्ञानदीपाप्रमाणें असणाऱ्या आणि लोकांना ( भवी जीवांना ) उपदेश देऊन उद्योत–ज्ञानप्रकाश करणाऱ्या देवांना ( माझा नमस्कार असो ). [ ४ ].

**अभयदयाणं चक्खुदयाणं मग्गदयाणं** – साही निकायच्या सर्व जीवांना अभयदान देणाऱ्या, विवेक आणि ज्ञानरूपी डोळे प्रदान करणाऱ्या, मुक्तीचा मार्ग दाखविणाऱ्या,

**सरणदयाणं बोहिदयाणं** – ह्या संसारचक्रांत वणवण फिरल्यामुळें गांजलेल्यांना शरण–आश्रय देणाऱ्या आणि ( शुद्ध देव, गुरु आणि धर्मावरील श्रद्धारूपी ) सम्यक्तत्वाचें दान देणाऱ्या देवांना ( माझा नमस्कार असो ). [ ५ ].

**धम्मदयाणं धम्मदेसयाणं धम्मनायगाणं** – सर्वविरति नि देशविरति – अशा दोन्ही प्रकारच्या धर्माची प्राप्ति करविणाऱ्या आणि समवसरणांत धर्माचा उपदेश करणाऱ्या धर्मनायकांना,

**धम्मसारहीणं धम्मवरचाउरंतचक्कवट्टीणं** – धर्मरूपी रथात ( ज्या प्रमाणें मेघकुमाराचा शिथिल झालेला भावरूपी रथ श्रीमहावीर

देवांनीं सन्मार्गांत स्थिर केला होता त्याप्रमाणें ) चालविणाऱ्या ध
आणि चाऱ्ही गतींच्या जन्म-मरण वगैरे समस्त दुःखांचा अंत-
पूर्ण नाश करणाऱ्या धर्मचक्रास धारण करणाऱ्या धर्मचक्रवर्ती
( माझा नमस्कार असो ). [ ६ ].

**अप्पडिहयवरनाणदंसणधराणं** - सर्वत्र अप्रतिहत-अ
अशा सर्वोच्च केवळज्ञान नि केवळदर्शनास धारण करणाऱ्यांना ( केव
देवांना आधीं ज्ञान नि मग दर्शन होतें, हेंही येथें सुचविलें आहे.

**वियट्टछउमाणं** - आणि ज्यांची अज्ञानमय छद्मस्थावस्था
व्यावृत्त-निवृत्त अर्थात् संपूर्णपणें नष्ट झाली आहे किंवा ज्यांनीं चार
कर्मांचा नाश केला आहे अशा देवांना ( माझा नमस्कार असो. )

**जिणाणं जावयाणं** - राग-द्वेषरूपी शत्रूंवर ज्यांनीं स्वतः ज
विला आहे आणि जे दुसऱ्यांना जय मिळवून देतात,

**तिन्नाणं तारयाणं** - संसारसमुद्रास जे स्वतः तरून गेले
आणि दुसऱ्या लघुकर्मी जीवात्म्यांस जागृत ( जागें ) करून जे
समुद्राच्या पार ( पैलतिरीं ) घेऊन जातात,

**बुद्धाणं बोहयाणं** - जे स्वतः शुद्ध-बुद्ध ज्ञानी झाले आहे
जे दुसऱ्या असंख्य जीवात्म्यांना ज्ञानदान करतात

**मुत्ताणं मोअगाणं** - आणि जे स्वतः कर्मबंधनापासून मुक्त
आहेत आणि जे दुसऱ्यांना ( ज्ञानाचा उपदेश करून ) कर्मबंध
मुक्त करून मोक्षास घेऊन जातात, अशा देवांना ( माझा
असो. ) [ ८ ].

**सव्वन्नूणं सव्वदरिसीणं** - केवलज्ञानाच्या प्रभावानें सर्वभा
स्थिति ) जाणणाऱ्या, अनंतदर्शन नांवाचा गुण प्रगट झाल्यामुळे
विश्वास ( करामलकवत् ) पाहाणाऱ्या,

**सिवमयलमरुअमणंतमक्खयमव्वाबाहमपुणरावित्ति** -

आनंदमय ( निरुपद्रव ), स्थिर ( अचल ), रोगरहित, अविनाशी, सर्व प्रकारच्या पिडेशिवायच्या आणि जेथें पोहोंचल्यानंतर ह्या जगांत पुनः कधींही जन्म घ्यावा लागत नाहीं अशा (ही सर्व मोक्षाचीं विशेषणें आहेत.)

**सिद्धिगइनामधेयं** – सिद्धिगति–मोक्षगति अर्थात् मुक्ति नांवाच्या

**ठाणं संपत्ताणं** – श्रेष्ठ स्थानास पोहोंचलेल्या

**नमो जिणाणं जिअभयाणं** – आणि राग–द्वेष व सर्व भयांना जिंकणाऱ्या श्रीजिनेश्वर देवांना माझा भक्तिभावपूर्वक नमस्कार असो. [९].

**जे अ अईआ सिद्धा** – जे भूतकाळीं ( श्रीतीर्थंकर पदास प्राप्त होऊन ) सिद्ध झालेले आहेत,

**जे अ भविस्संतिणागए काले**–जे भविष्यकाळीं श्रीसिद्ध देव होतील

**संपइ अ वट्टमाणा** – आणि वर्तमान समयीं जे २० श्रीतीर्थंकर देव विहार ( संचार ) करीत आहेत,

**सव्वे तिविहेण वंदामि** – त्या सर्वांना मी त्रिविध ( मन, वाणी व शरीरानें ) नमस्कार ( वंदन ) करतो. [ १० ].

## भावार्थ

श्रीतीर्थंकर देवांच्या कल्याणकाच्यावेळीं इंद्र हें सूत्र इंद्रसभेंत म्हणून त्यांची स्तुति करतात, म्हणून हें शाश्वत सूत्र फारच प्रसिद्ध आहे. ह्या सूत्रांत श्रीजिनेश्वर देवांच्या वास्तविक गुणांना विविध उपमा-अलंकारांनीं सजवून त्यांचें लालित्यपूर्ण वर्णन केलें आहे. देवांच्या समोर हें सूत्र म्हणत असतांना जेव्हां आपण सूत्रांतील शब्दांच्या गूढ रहस्यांचा विचार करतो, तेव्हां आपलें हृदय भक्तिभावानें व आनंदानें भरून जातें. श्रीजिनमंदिरांत देवांच्या समोर 'चैत्यवंदन' केल्यानंतर सुद्धां डावा गुडघा तसाच उंच (उभा) टेकून दोन्ही हात जोडून नम्रतेनें (विनयपूर्वक) हें सूत्र म्हणण्याचा विधि आहे. प्रतिक्रमण, देववंदन वगैरे करतांना सुद्धां हें सूत्र अशा प्रकारें ( अशाच मुद्रेत )च बोलण्याचें विधान आहे.

# परिमल

※ आज जर माहिती एकत्र केली तर आपणास असें दिसेल की, सर्वसामान्य मनुष्यास आपल्या वाडवडिलांचीं नांवें, जास्तीतजास्त सात पिढ्यांपर्यंतचींच ठाऊक असतात आणि कर्मठपणें जनसेवा-लोकोपकार करणाऱ्या महाराजा कुमारपाळ, शिवाजी महाराज किंवा अशाच दुसऱ्या पुढाऱ्यांचीं नांवें इतिहासांत लिहिलीं गेल्यामुळें कित्येक शतकांपर्यंत लोकांच्या स्मरणांत रहातात. त्याचप्रमाणें अनंत गुणसंपन्न आणि साही जीवनिकायांच्या प्राणीमात्रावर त्रिकाल परमोपकार करणाऱ्या श्रीतीर्थंकर देवांचीं ह्या सूत्रांत वर्णिलेलीं मंगलकारी नांवें तीन 'चोविशी' पर्यंत आगमांत रहातातच. हें सुद्धां श्रीवीतरागी देवांच्या श्रेष्ठतेचें एक लक्षणच आहे.

※ अभयदान, ज्ञानचक्षूचें दान नि मोक्षमार्गाचें दान— हीं सर्व शरणागतवत्सल प्रभूंच्या भक्तिवृक्षाचीं उमललेलीं (व त्यामुळें ज्यांचा सुवास सर्वत्र दरवळलेला आहे अशीं) फुलें आहेत आणि हाच ह्या सूत्राचा सुवास ('परिमल') आहे.

※ धर्म रथ आहे तर श्रीतीर्थंकर देव सारथि आहेत. शास्त्रांस तर ह्या दोघांचीही फारच जरूर (गरज) आहे.

※ श्रीकेवलज्ञानी देवांचे महान् गुण, मुमुक्षुंसाठींचा (दुसऱ्याला मिळावी म्हणूनचा सुद्धां) त्यांचा आटोकाट प्रयत्न, भवी जीवांना उपदेश देऊन ज्ञान देणें-जागृत करणें व त्यामुळें त्यांचें (भवी जीवांचें) ध्येय- 'मोक्ष' हेंच नक्की करविणें— वगैरे गोष्टी म्हणजे ह्या सूत्रांतील गूढ रहस्यें (Subtle central Ideas) होत.

※ उन्मार्गानें जाणाऱ्या घोड्यांना वठणीवर आणून रथ योग्य मार्गी चालविण्यांत जो कुशल-हुषार असतो, तोच खरा सारथि होय. संसारांतील विषय-कषायरूपी उन्मार्गाकडेच आपल्या मनरूपी घोड्याचा नेहमीं ओढा असतो, श्रीतीर्थंकर देव त्यास (आपल्या मनास) ठिकाणीं आणून मोक्षाच्या सत्यमार्गावर आणतात. म्हणूनच ते यथार्थ धर्मसारथि व आमचे निष्कारणबंधु आहेत.

※ चक्रवर्ती राजा आपल्या चक्राच्या साहाय्यानें साही खंडांचें साम्राज्य

जिंकतो, त्याचप्रमाणें श्रीतीर्थंकर देव सुद्धां धर्मचक्रानें स्वतःच्या व सर्व जीवांच्या चार्‍ही गतींचा नाश करतात नि धर्माचें साम्राज्य निष्कंटक बनवितात.

## सरळ प्रश्नोत्तरें

**प्रश्न १** — ' नमुत्थु णं ' सूत्र कोणी आणि केव्हां बनविलें ?

**उत्तर** — स्वतःचें सिंहासन जेव्हां कंपित होतें ( हालतें ) तेव्हां इंद्र हें सूत्र म्हणतात. श्रीतीर्थंकर देवांचें जन्मकल्याणक साजरें करण्यासाठीं त्यांना मेरु पर्वताच्या शिखरावर नेऊन, तेथें अनेक कलशजलांनीं अभिषेक केल्यानंतर श्रीइंद्र वगैरे देव प्रभूंची जी स्तुति करतात, ती ह्या सूत्रांतच आहे. तीर्थाच्या हिशोबानें श्रीतीर्थंकर देवांचे गणधरच ' नमुत्थु णं ' सूत्र बनवितात, परंतु हें सूत्र शाश्वत आहे ( अर्थात् वास्तविक रितीनें म्हटलें तर गणधर ह्या सूत्रास प्रकाशांत आणण्याचें काम करतात. म्हणजे ते ह्या सूत्राचे द्रष्टे होत. ) ह्या सूत्रांत ३५ विशेषणांनीं देवांची स्तुति करण्यांत आली आहे.

**प्रश्न २** — ' नमुत्थु णं ' सूत्राचें दुसरें नांव काय आहे ?

**उत्तर** — शक्रस्तव किंवा इंद्रस्तुति.

**प्रश्न ३** — ह्या सूत्रांत देवांना इतकीं सर्व ( वरीचशीं ) विशेषणें कां दिलीं आहेत ?

**उत्तर** — ह्या जगांत पाहिलें तरीही आपणांस असें दिसतें कीं मनुष्य जितका जास्त शिकलेला तितक्या त्याला उपाध्या (डिग्र्या) जास्त. तरीही जगांतल्या ह्या शिकलेल्या लोकांचें ज्ञान कधींही पूर्ण होऊं शकत नाहीं. पण श्रीतीर्थंकर देव तर परिपूर्ण ज्ञानी – केवलज्ञानी आहेत. जेथें अपूर्ण ज्ञान असलेल्यांनाच पुष्कळशा उपाध्या ( डिग्र्या ) दिल्या जातात, तेथें पूर्णज्ञानी अशा देवांना किती दिल्या पाहिजेत ? ह्यामुळें एक गोष्ट लक्षांत येईल कीं ह्या सूत्रांत श्रीतीर्थंकर देवांना जीं कांहीं विशेषणें दिलीं

आहेत, तीं मुळींच जास्त नाहींत. त्यांतील एक मुद्दां विशेषण देवांच्या वास्तविक महत्तेपेक्षां जास्त महत्ता दाखविणासाठीं नाहीं. अनंतगुणसंपन्न देवांच्या अनंत गुणांसमोर हीं विशेषणें फारच थोडीं आहेत आणि जीं आहेत तीं गुणनिष्पन्नच आहेत. हें सूत्र म्हणजे देवांच्या निवडक-निवडक विशिष्ट गुणांचा संग्रहच आहे.

**प्रश्न ४** — ३५ विशेषणें काय सुचवितात ?

**उत्तर** — श्रीतीर्थंकर देवांना सोडून त्यांच्याइतकी श्रेष्ठता दुसऱ्या कुठेंही असूं शकत नाहीं. ज्याप्रमाणें आपणा सर्वांना कोणा तरी दुसऱ्याच्या उपदेशाची जरूर पडते, त्याप्रमाणें श्रीतीर्थंकर देवांना कोणाच्याही उपदेशाची आवश्यकता नसते. त्यांच्या एवढें अनंत ऐश्वर्य ( ऋद्धि-सिद्धि ) त्यांच्याशिवाय दुसरा कोणीही जिरवूं शकत नाहीं. त्यांनीं खरा रस्ता दाखविल्याशिवाय कोणाचाही उद्धार झाला नाहीं नि होणारही नाहीं. त्यांच्या कृपादृष्टीशिवाय लोककल्याण होऊंच शकत नाहीं. जगाच्या दगदगीमुळें त्रस्त नि निराधार झालेला जीवात्मा श्रीतीर्थंकर देवांना शरण गेल्याशिवाय ह्या भयंकर संसार-समुद्रास पार करूं शकत नाहीं. ह्या संसार-समुद्रास तरून पैलतिरीं जाण्याचें शिक्षण देण्याकरितां दुसरा कोण वरें समर्थ आहे ? अशा पुष्कळशा गोष्टी ह्या विशेषणामुळें आपणास समजतात.



# ( १४ ) श्री जावंति चेइआइं सूत्र

## अन्वयार्थ

**जावंति** – जितकीं. **चेइआइं** – चैत्यें ( जिनमंदिरें ). **उड्ढे** – ऊर्ध्वलोकीं, स्वर्गांत. **अ** – आणि. **अहे** – अधोलोकांत, पाताळांत. **तिरिअलोए** – तिर्च्छालोकांत, मनुष्यलोकांत. **सव्वाइं** – सर्वांना. **ताइं** –

त्यांना. वंदे – मी नमस्कार (वंदन) करतो. इह – येथें. संतो – (उभा) राहून (सुद्धां). तत्थ – तेथें (दूरदूरवर). संताइं – असलेल्यांना (चैत्यांना, श्रीजिनमंदिरांना).

## सूत्रार्थ

**जावंति चेइआइं** – जितकीं म्हणून जिनमंदिरें

**उड्ढे अ अहे अ तिरिअलोए अ** – स्वर्ग, पाताळ आणि मृत्यु ह्या तिन्ही लोकांत आहेत;

**सव्वाइं ताइं वंदे** – त्या सर्व जिनमंदिरांना मी नमस्कार (वंदन) करतो.

**इह संतो तत्थ संताइं** – येथें असून (सुद्धां) तेथें (तीन लोकांत दूरदूरवर) असलेल्या (जिनमंदिरांना मी नमस्कार करतो. तिन्ही लोकांतील भव्य जिनमंदिरांच्या भावयात्रेचें फळ लाभण्यासाठीं त्यांचें समाधिगत स्मरण करून मी त्यांना नमस्कार करतो.)

## भावार्थ

तिन्ही लोकांत असलेल्या जिनमंदिरांना ह्या सूत्रानें नमस्कार (वंदन) केला जातो. त्रिभुवनांतील सर्व जिनमंदिरांत दर्शनासाठीं जाणें मनुष्यास शक्य नसतें; म्हणून येथेंच (मंदिर वगैरे ठिकाणीं) चैत्यवंदन करीत असतांना त्या दूरदूरच्या सर्व चैत्यांचें स्मरण-चिंतन करण्यास हें सूत्र शिकवितें.

## परिमल

❁ शुभ (पुण्याच्या) कार्यास जितकें म्हणून अनुमोदन दिलें जाईल, तितकें पुण्य आपणास प्राप्त होतें. येथें— ह्या सूत्रानें तीर्थयात्रेनें अनुमोदन केल्यानें सुद्धां पुष्कळ मोठा फायदा होतो. उत्तम (शुभ) कार्यांनें अनुमोदन न केल्यामुळें— त्याच्याबद्दल उपेक्षा बाळगल्यानें सुद्धां पाप लागतें, असें श्रीज्ञानी

देवांचें म्हणणें आहे. जागा जर उतरती असेल तर पाण्यास खालीं आणण्यास वेळ लागत नाहीं नि त्रासही होत नाहीं; पण पाण्यास वर चढवावयाचें असल्यास इलेक्ट्रिक मोटर (मशीन) ठेवावी लागते; त्याचप्रमाणें धर्म करणाऱ्या जीवात्म्यास उत्तेजन न मिळाल्यामुळें किंवा त्याच्या कामांत अंतरायभूत झाल्यामुळें किंवा त्याची उपेक्षा केल्यामुळें किंवा त्यास पूर्ण साहाय्य न मिळाल्यामुळें त्याचें पतन होण्यास काळ-वेळ लागत नाहीं; म्हणून अनुमोदन हें सुद्धां एक प्रकारचें प्रोत्साहनच आहे. अनुमोदन करणाऱ्यासही फायदा होतोच– त्याचाही उत्कर्ष होतोच. अशा प्रकारें शुभ कृत्याचें अनुमोदन केल्यानें धर्म करणारा जीवात्मा उच्च भावनांनीं युक्त होतो. त्याचप्रमाणें ह्या सर्व चैत्यांना (भाव)वंदन केल्यानें नि वंदन करणाऱ्यांचें अनुमोदन केल्यानेंही पुष्कळसें पुण्य लाभतें.

- नातेवाईक नि घनिष्ट संबंध असलेल्यांची आठवण आपलें मन स्वाभाविकपणेंच करतें; कारण त्यांच्याबद्दल आपल्याला प्रेम असतें. त्याचप्रमाणें सम्यक्त्वरूपी संबंधामुळें देव-गुरु-धर्मावर प्रीत जडते आणि त्यामुळें सहजिकपणेंच धर्माची आठवण करण्याचें मन होतें; म्हणून मंदिरांत जाऊन ह्या सर्व (त्रैलोक्यांतील) दूरदूरच्या चैत्यांना व श्रीजिनेश्वर देवांच्या मूर्तींना (ज्याप्रमाणें नातेवाईक नि ओळखीच्यांशीं टेलिफोननें गोष्टी करतो त्याप्रमाणें) नमस्कार करण्याचें मन होतें. ह्या सूत्रापासून असे अनेक फायदे होतात.
- स्वर्गांत नि पाताळांतसुद्धां जिनमंदिरें आहेत, ही गोष्ट जर ज्ञानी देवांनीं आम्हांस ह्या सूत्रद्वारा सांगितली नसती तर हा शोध (हें ज्ञान) आम्हांस कोठून लागला असता ?

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — 'जावंति चेइआइं'चा अर्थ सविस्तर समजवा.

उत्तर — तिन्ही लोकांतील भूत, भविष्य नि वर्तमानकाळच्या (अशेष-सर्वच्या सर्व) जिनमंदिरांना नि जिनमूर्तींना ह्या सूत्रांत वंदन केलें आहे. येथें राहून सुद्धां त्या दूरदूरच्या चैत्यांना नि तेथील अलौकिक

त्यांतही फक्त आर्यक्षेत्रांतच ) मोक्षाच्या प्राप्तीकरितां प्रयत्न (साधना, तप) होऊं शकतो. अर्थात् ह्या आर्यक्षेत्रांतच चारित्र्य-संपन्न मुनिराज विहार करीत असतात. ह्या सूत्रांत त्या पूज्य मुनिराजांचें स्मरण करून त्यांना नमस्कार करण्यांत आला आहे.

## परिमल

- श्रीजिनेश्वर देव आणि त्यांच्या मूर्तीप्रमाणें मुनिराज हे सुद्धां आत्मभावनेस प्रदीप्त-सतेज करण्याचें असाधारण निमित्त-कारण असल्यानें हें सूत्र जिन-मंदिरांत बोलण्यास कांहींच हरकत नाहीं.
- हें सूत्र जिनमंदिरांत देवाच्या समोर म्हणण्याचें विधान आहे. ह्या सूत्रानें ज्या मुनिराजांना नमस्कार केला जातो, त्यांत सामान्य केवळी मुनिराज, परमावधिसंपन्न, लब्धिधर, १४ पूर्वधर, महाज्ञानी मुनिराज आणि महान् श्रुतधरांचाही समावेश होतो आणि जेथें सामान्य केवळी मुनिराजसुद्धां पाच परमेष्ठीपैकींचेच आहेत, तेथें जिनमंदिरांत त्यांना जो नमस्कार केला जातो, तो योग्यच म्हटला जाईल.
- मनदंड, वचनदंड नि कायदंड– ह्या तिन्ही दंडांपासून ह्या जगास क्षणो-क्षणीं दुःख होत असतें. फक्त भावसाधु महाराजच ह्यांच्या डावांत सांपडत नाहींत.
- १५ कर्मभुमींतील मुनिराजांना जो नमस्कार केला जातो, त्यांत केवळज्ञानी, महान् श्रुतधर, १४ पूर्वधर, दुसरे संयमी मुनिराज आणि पूज्य साध्वीजी महाराजांना सुद्धां नमस्कार केला जातो. इतक्या महान् प्रभावशाली साधु-संतांना नमस्कार करणारा जीवात्मा (स्वतः) सुद्धां वंदन करण्यास योग्य असाच होतो.
- जितकें देवतत्त्व, तितकेंच गुरुतत्त्वही तारक मानलें गेलें आहे. गुरु महाराजच आम्हांस देवतत्त्व नि धर्मतत्त्वाची ओळख करून देतात; म्हणून ह्या तत्त्वत्रयींत गुरुतत्त्व विसरलें जाऊं नये, ह्या हेतूनें हें साधुवंदन सूत्र जिनमंदिरांत बोलण्याचें विधान असणें आवश्यक आहे.
- ज्याप्रमाणें आगगाडींत, इंजिन, गार्ड आणि डबे— ही तत्त्वत्रयी, त्याप्रमाणें शासनांत (शासनरूपी मोक्षमार्गाच्या गाडींत अनुक्रमें ) देव, गुरु नि धर्म—

ही तत्त्वत्रयी परस्पर संबंधित ( आणि संवेदित यात्रा-प्रवास निर्विघ्नपणें पूर्ण करणारी ) आहे.

꧁ पांची परमेष्ठींत साधुना हा समान गुण असल्यानें देवांबरोबर गुरु महाराजांचेंही स्मरण करणें योग्य आहे, असें समजून जिनमंदिरांत हें सूत्र म्हणण्याचें विधान असणें आवश्यक आहे.

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — ' जावंत के वि साहू ' हें सूत्र कशासाठीं आहे ? तीन दंड कोणते नि कोणाचे ?

उत्तर — १५ कर्मभूमींत अर्थात् अडीच द्वीपाच्या मनुष्यलोकांत ( आणि त्यांतही फक्त आर्यक्षेत्रांतच ) विहार ( संचार ) करणाऱ्या साधु महाराजांना नमस्कार करण्यासाठीं हें सूत्र आहे. मन, वाणी नि शरीर या तिघांचे अशुभ ( पाप ) कर्मरूपी तीन दंड आहेत : मनदंड, वचनदंड आणि कायदंड. साधु महाराज ' तिदंडविरयाणं '– त्रिदंड-विरत अर्थात् या तीन दंडांपासून रहित ( मुक्त ) आहेत.

प्रश्न २ — ' तिन्ही दंडांपासून विरत ' म्हणजे काय ?

उत्तर — ' मन दुष्ट असल्यानें तें वरेंच वाईट चिंतन करितें नि त्यामुळें पाप लागतें ही गोष्ट अधिकांश लोक समजत सुद्धां नाहींत. बोलण्यानें सुद्धां द्वेष-वैर होतें नि पाप लागतें. शरीरानें होणारीं पापें तर लोकांना आवरतां सुद्धां येत नाहींत.

साधु महाराज तर या तिन्ही पापदंडांपासून अगदीं अलिप्त राहून पवित्र असें जीवन जगतात; म्हणूनच त्यांना ' तिदंडविरयाणं – तिन्ही दंडांपासून विरत ' असें म्हटलें आहे. तीन दंडांशिवायचें जीवन जगण्यांत अतिशय मोठें महत्त्व–गौरव समाविलेलें आहे. तीन दंडांनीं त्रस्त अशा जीवांना तीन दंडांनीं मुक्त ( रहित ) अशा साधु महाराजांच्या जीवनाशीं आपल्या स्वतःच्या जीवनाची तुलना करण्याचें येथें परोक्ष रितीनें सुचविलें

आहे. पवित्र कोण नि अपवित्र कोण ? — ह्याचा विचार-विनिमय करण्याची इच्छाही आम्हांस ह्या सूत्रामुळेंच होते.



# (१६) श्री पंचपरमेष्ठिनमस्कार सूत्र

## अन्वयार्थ

**नमो** – ( माझा ) नमस्कार असो. **अर्हत्** – अरिहंत. **सिद्ध** – सिद्ध. **आचार्य** – आचार्य. **उपाध्याय** – उपाध्याय. **सर्वसाधुभ्यः** –(आणि) सर्व साधु(–साध्वीजी ) महाराजांना.

## सूत्रार्थ

**नमोऽर्हत्सिध्दाचार्योपाध्यायसर्वसाधुभ्यः** – अरिहंत देव, सिद्ध देव, आचार्य महाराज, उपाध्यायजी महाराज आणि सर्व साधु(–साध्वीजी) महाराज — ह्या पांची परमेष्ठयांना ( माझा ) नमस्कार असो ( मी त्यांना नमस्कार करतो ).

## भावार्थ

हें सूत्र म्हणजे नवकार महामंत्राचें संक्षिप्त रूप होय. १४ पूर्वांचें सार नवकार मंत्र आहे नि ह्या लहानशा सूत्रांत तर नवकार मंत्र सुद्धां अगदीं थोडक्यांतच येऊन जातो.

## परिमल

नवकार मंत्र सर्व मंगलाचें मूळ आहे, श्री जैन शासनाचें सार आहे, ११ अंग आणि १४ पूर्वांचें रहस्य ( मर्म ) आहे, त्रिकालाबाधित ( शाश्वत ) असा महामंत्र आहे, सर्व मंत्रांत श्रेष्ठ आहे, सर्व मनोरथ पूर्ण करणारा आहे आणि अत्यंत चमत्कारपूर्ण आहे. ह्या नवकार मंत्राचा संक्षेप करून य

पूर्वांतून उद्धृत करून श्री सिद्धसेन दिवाकरसूरिजी महाराजांनी हें सूत्र ( संस्कृत भाषेंत ) बनविलें.

- नवकार मंत्राचा संक्षेप ' नमोऽर्हत् ' सूत्र आहे, त्याचा संक्षेप ' असिआउसा ' आहे नि त्याचाही संक्षेप ' ॐ ' कार आहे; म्हणूनच ' ॐ ' कार ध्येयस्वरूप नि मंत्रबीज आहे.
- जगांत हे पांच परमेष्ठीच सारभूत आहेत, जैन शासनाचा मूळ पाया नि विरतीचें माहेरघरही हेच आहेत— असें हें सूत्र अगदीं स्पष्ट समजावितें.
- एकमात्र मुक्तीचीच साधना ( आराधना ) करणाऱ्या ह्या पांच परमेष्ठी देवां-शिवाय जगांत दुसरा कोणीही आपल्यासाठीं नमस्कार करण्यास योग्य नाहीं, अशी माहिती हें लहानसें सूत्र आम्हांस देतें. ह्या देवांशिवाय जगांत सर्व असत् आहे अर्थात् मोक्षसाधनाशिवायची दुसरी कोणत्याही प्रकारची प्रवृत्ति जन्म-मरण वाढविणारी ( त्रासदायक ) आहे— अशी माहिती हें सूत्र आपणास परोक्ष रितीनें देतें.

## सरळ प्रश्नोत्तरें

**प्रश्न १** – ' नमोऽर्हत् ' सूत्र कोणी बनविलें ? त्याविषयीं तुम्हांस काय माहिती आहे ?

**उत्तर** – सम्राट श्रीविक्रमादित्य महाराजांना उपदेश करून जागृत करणाऱ्या पूज्य श्री सिद्धसेन दिवाकरसूरीश्वरजी महाराजांनीं हें सूत्र बन-विलें — दृष्टिवादांतून उधृत करून प्रकाशांत आणलें. ह्या सूत्रांत पांची परमेष्ठयांना नमस्कार केला गेला आहे. हें सूत्र म्हणजे नवकार महामंत्राचें संस्कृत भाषेंतील संक्षिप्तरूप होय.

**प्रश्न २** – स्त्रियांना ' नमोऽर्हत् ' सूत्र बोलण्याचा निषेध का आहे ?

**उत्तर** – हें सूत्र दृष्टिवादांतून उधृत केलेलें असून नियमाप्रमाणें स्त्रियांना दृष्टिवादांतील सूत्रें म्हणण्याचा अधिकार नसल्यामुळें स्त्रियांना हें ' नमोऽर्हत् ' सूत्र म्हणण्याची मनाई आहे.



# ( १७ ) श्री उवसग्गहरं स्तो

## अन्वयार्थ

**उवसग्ग** – (ज्यांच्या शासनांत भक्तांच्या) उपसर्ग किंवा उपद्रवांचा. **हरं** – नाश करणारा. **पासं** – पार्श्व नांवाचा देवांचा भक्त – सेवक, शासनरक्षक आहे, अशा). **पासं** – देवांना. **वंदामि** – मी नमस्कार (वंदन) करतो. **कम्मघ** कर्मांच्या समुहापासून. **मुक्कं** – (जे देव) मुक्त आहेत. **विसह** सापाच्या. **विस** – विषाचा (लक्षणेनें मिथ्यात्वरूपी विषा **निन्नासं** – ज्यांच्या प्रभावानें–सामर्थ्यानें अगदीं नायनाट होतो आणि मंगल. **कल्लाण** – नि (सुखाची वृद्धि करणाऱ्या) (जे देव). **आवासं** – मूळस्थान अर्थात् माहेरघर आहेत. [ १ ] **फुलिंगमंतं** – 'विषधरस्फुलिंग' नांवाच्या मंत्रास. **कंठे** (अर्थात् मुखांत, हृदयांत) **धारेइ** – धारण करतो म्हणजे ह अहर्निश जप करतो. **जो** – जो. **सया** – नेहमीं, सदासर्वदा. मनुष्य. **तस्स** – त्यास (त्रास देणारे). **गह** – मंगळ, शनि अ **रोग** – अनेक प्रकारचे रोग. **मारी** – पटकी, प्लेग, महामारी. दुष्ट–अनेक प्रकारचे भयंकर असे. **जरा** – ताप. **जंति** **उवसामं** – शांत, नष्ट. [ २ ]. **चिट्ठउ** – राहो. **दूरे** – दूर, लांब तो मंत्र तर (अर्थात् त्या मंत्राचा प्रभाव तर). **तुज्झ** – (प **पणामो** – (फक्त खऱ्या–खुऱ्या अंतःकरणानें–भक्तिभावानें) नमस्कार. **वि** – सुद्धां. **बहुफलो** – अगदीं पुष्कळ नि श्रेष्ठ–उ फळें देणारा. **होइ** – होतो. **नर** – (मग प्रणाम करणारे जीव) किंवा **तिरिएसु** – तिर्यंच (गतीसही प्राप्त झाले असले तरी सु **जीवा** – जीवांना. **पावंति** – प्राप्त होत, भोगावें लागत. **न**

**दुक्ख** – दुःख. **दोगच्चं** – दुर्दशा किंवा दारिद्र्य (अर्थात् त्यांस श्रेष्ठ-उत्तम सुखाचीच प्राप्ति होते). [३]. **तुह** – आपलें. **सम्मत्ते** – किमती असें सम्यक्त्वरूपी रत्न. **लद्धे** – मिळाल्यामुळें. **चिंतामणि** – (शुद्ध देव, गुरु नि धर्मावरील श्रद्धारूपी हें सम्यक्त्व-रत्न) चिंतामणि रत्न. व **कप्पपायव** – कल्पवृक्षापेक्षांही. **अब्भहिए** – अभ्यधिक, अधिक श्रेष्ठ (असून तें मिळाल्यानंतर). **पावंति** – प्राप्त होतात अर्थात् जातात. **अविग्घेणं** – अडचणी आल्याशिवाय अर्थात् लगेच (अडचणी आल्या म्हणजेच उशीर होत असतो.) **जीवा** – भक्त जीव. **अयरामरं** – अजर-अमर [अर्थात् जेथें (जन्म,) म्हातरपण (, रोग) नि मरण नाहींत] अशा सर्वश्रेष्ठ मोक्ष नांवाच्या. **ठाणं** – स्थानीं. [४]. **इअ** – अशा प्रकारें. **संथुओ** – मी ज्यांची स्तुति केली आहे. **महायस!** – आणि ज्यांची अगाध यशोगाथा त्रिभुवनांत व्यापलेली आहे, अशा हे महा यशस्वी देवा! **भत्ति** – भक्तीच्या. **ब्भर** – भरतीनें. **निब्भरेण** – ओतप्रोत [illegible] ओथंबलेल्या. **हियएण** – हृदयानें, अंतःकरणानें. **ता** – म्हणून. [illegible] – हे देवा! **दिज्ज** – मला दे. **बोहिं** – बोधिबीज, सम्यक्त्व[illegible] **भवे** – जन्मोजन्मीं, ह्या जन्मांत नि पुढील सर्व जन्मांत. [illegible] नाथ देवा! **जिणचंद!** – सामान्य केवलींत[illegible] शोभणाऱ्या (हे देवा!). [५].

## सूत्रार्थ

**विसहर विसनिन्नासं** – सापाच्या विषाचा ( नि लक्षणेनें मिथ्यात्व-रूपी विषाचा देशनारूपी अमृतानें ) नाश करणाऱ्या

**मंगलकल्लाणआवासं** – नि मंगल आणि कल्याणाचें (जे देव) माहेरघरच आहेत अशा देवांना मी नमस्कार करतो ). [ १ ].

**विसहरफुलिंगमंतं** – श्रीपार्श्वनाथ देवांचें नांव असलेल्या व चमत्कार-पूर्ण अशा 'विषधरस्फुलिंग' मंत्रास

**कंठे धारेइ जो सया मणुओ** – जो पुरुष किंवा जी स्त्री आपल्या हृदयांत नेहमीं धारण करतो-करते अर्थात् जे ह्या मंत्राचा अहर्निश जप करतात,

**तस्स गहरोगमारी** – ( जर ) त्यांना राहू, मंगळ, शनि वगैरे ग्रहांची पीडा असेल किंवा ह्या ग्रहांपासून कांहीं नुकसान होत असेल; ते एखाद्या रोगामुळें खितपत असतील, पटकी प्लेगामुळें त्रासले असतील

**दुट्ठजरा जंति उवसामं** – किंवा अनेक प्रकारच्या दुष्ट ज्वरांची ( उदा. – मुदतीचा, पाळीचा वगैरे ) पीडा असेल ( तर ) त्यांच्या ह्या सर्व अडचणींचा ह्या मंत्राच्या अहर्निश स्मरणानें ( जपानें ) नाश होतो. [ २ ].

**चिट्ठउ दूरे मंतो** – मंत्राच्या चमत्काराची गोष्ट बाजूला राहो, तो तर अपूर्व आहेच, ( मंत्रांचा प्रभाव नि औषधींचे गुण फारच अद्भुत – चमत्कारपूर्ण असतात; म्हणून मंत्राच्या चमत्काराची गोष्ट दूर राहो. )

**तुज्झ पणामो वि बहुफलो होइ** –( परंतु हे निराधारांच्या आधारा ! हे अनाथांच्या नाथा ! हे अनंत ऐश्वर्यसंपन्न देवा ! मंत्राचा प्रभाव तर सर्वविदित आहेच, परंतु कांहींही कष्ट केल्याशिवाय, तप-व्रतवैकल्यें केल्याशिवाय, तुझें एकमात्र नामस्मरण केल्यानें किंवा ) तुला खऱ्या अंतःकरणानें फक्त एकच नमस्कार केला तरी सुद्धां अनेक फायदे होतात. * आणि

---

* 'बहुफलो' म्हणजे सौभाग्य, आरोग्य, धन, धान्य, स्त्री, पुत्र, सर्व प्रकारचीं वैभवें, चक्रवर्ती–इंद्र आदि ऐश्वर्य वगैरेंची प्राप्ति.

**नरतिरिएसु वि जीवा** – मनुष्य व तिर्यंच गतींतील जीवात्म्यांना सुद्धां

**पावंति न दुक्ख-दोगच्चं** – दुःख व दारिद्र्य–दुर्दशा भोगावी लागत नाहीं ( मनुष्य, तिर्यंच किंवा दुसऱ्या कोणत्याही गतीस गेलेला जीव खऱ्या भावनेनें केलेल्या नमस्काराच्या प्रभावानें तेथेंही शक्य असलेलीं सर्व सुखें मिळवितो ). [ ३ ].

**तुह सम्मत्ते लद्धे चिंतामणिकप्पपायवब्भहिए** – सर्व मनःकामना पूर्ण करणारे चिंतामणि रत्न व कल्पवृक्षाचें झाड, ह्यांच्या पेक्षांही अभ्यधिक–अधिक श्रेष्ठ अर्थात् मोक्षापर्यंतच्या सर्व इच्छा पूर्ण करणारे ( आणि सुदेव, सुगुरु नि सद्धर्म यांच्यावरील निश्चल श्रद्धारूपी ) आपलें साम्यग्दर्शन ( सम्यक्त्व ) रत्न मिळाल्यानंतर

**पावंति अविग्घेणं** – कांहींही अंतराय, विघ्न किंवा अडचणी आल्याशिवाय पावतात ( जातात ).

**जीवा अयरामरं ठाणं** – भवी जीव ( म्हातारपण नि मरणाशिवायच्या ) अजरामर अशा मोक्षास ( जातात ). [ ४ ].

**इअ संथुओ महायस !** – हे महायशस्वी पार्श्वनाथ देवा ! अशा प्रकारें मीं तुझी स्तुति केली.

**भत्तिब्भरनिब्भरेण हियएण** – भक्तीच्या उद्रेकानें ( भावोद्रेकानें ) ओथंबलेल्या हृदयानें ( अत्यंत भक्तिभावानें ).

**ता देव ! दिज्ज बोहिं** – म्हणून हे देवाधिदेवा ! मला बोधिबीज-सम्यक्त्व दे. ( सम्यक्त्वानें मोक्ष मिळतो म्हणून मीं सम्यक्त्वाचीच मागणी करतो. )

**भवे भवे पास-जिणचंद !** – ( कल्याण करणाऱ्या, विघ्नांचा नाश करणाऱ्या, धरणेंद्र नि पद्मावती यांच्याकडून पुजल्या गेलेल्या, अत्यंत कारुणिक आणि ) केवलीरूपी चांदण्यांत चंद्राप्रमाणें शोभणाऱ्या हे

पार्श्वनाथ देवा ! ( ह्या भक्तिभावानें केलेल्या स्तुतीचें फळ म्हणून मला ) जन्मोजन्मीं ( सम्यक्त्व दे ). [ ५ ].

## भावार्थ

ह्या सूत्रांत श्रीपार्श्वनाथ प्रभूंच्या प्रभावाचें वर्णन करण्यांत आलें आहे. संकटाच्या वेळीं हें स्तोत्र २१ वेळा म्हटल्यानें पुष्कळसा फायदा होतो. हें स्तोत्र महामंत्रगर्भित आहे. ह्या सूत्रांत पूर्वी सात गाथा ( कडवीं ) होत्या, परंतु सूत्रकार १४ पूर्वधर श्रीभद्रबाहुस्वामी महाराज यांनीं स्वतःच कित्येक कारणांमुळें मागाहून दोन गाथांचा ( कडव्यांचा ) तिरोभाव केला ( त्यांना गुप्त केल्या ) — अशी आख्यायिका आहे. ह्या सूत्रांत सम्यक्त्वाच्या प्राप्तीवर पुष्कळच भर देण्यांत आला आहे.

## परिमल

- जीवांना दुःख, दारिद्र्य, आपत्ति किंवा संकटें नको असतात, परंतु त्यांच्या मागें कांहीं-ना-कांहीं तरी उपाधि लागलेली असतेच. म्हणून ह्या सर्व त्रासापासून सुटका करून घेण्यासाठीं श्रीपार्श्वनाथ देवांना नमस्कार करण्याचें आणि ' विषधरस्फुलिंग ' मंत्राचा अहर्निश जप करण्याचें ह्या सूत्रांत परोक्ष रीतीनें विधान करण्यांत आलें आहे.
- ' सम्यक्त्वाची प्राप्ति होणें ' म्हणजे मुक्तीच्या प्रयाणाची दिशा निश्चित होणें— ( पूर्व पुण्याईनें ) मोक्षास जाण्याचा रस्ता मिळणें ( हातीं लागणें ). जीवात्म्यास हळूहळू सुयोगाची प्राप्ति होणें; मोठ्या कष्टानें ( घोर तपश्चर्या करून ) मिळालेल्या सम्यक्त्व-रत्नास निर्मळ ठेवण्यासाठीं योग्य समय व परिस्थितीकरितां जीवात्म्याचा दीर्घोद्योग ( सतत प्रयत्न ); हळूहळू परंतु स्थिरचित्तानें मुक्तिमार्गी प्रयाण करतां करतां मोक्षाच्या जवळ जवळ जाणें नि सरते शेवटीं मोक्षही प्राप्त करणें— हा भाव दाखविण्यासाठीं चौथ्या गाथेंत ( कडव्यांत ) मुक्ति व सम्यक्त्वाचा " कार्यकारण भाव " वर्णिला आहे. सम्यक्त्व कारण आहे व मुक्ति कार्य आहे.

- इतर ( बाकीच्या ) २३ तीर्थंकर देवांच्या शासनरक्षिका देवी स्वस्थानापासून च्यवन पावल्या असून फक्त श्रीपार्श्वनाथ देवांची शासन-अधिष्ठायिका देवी ( पद्मावती ) अजून स्वस्थानीं विद्यमान आहे. ह्या कारणामुळें जेथें जेथें श्रीपार्श्वनाथ देवांच्या मूर्ति आहेत, तेथें तेथें चमत्कार ऐकावयास मिळतो. स्वतः अजून स्वस्थानीं विद्यमान असल्यामुळें पद्मावती देवी प्रभूंचा उपकार मानून त्यांच्या भक्तांना साहाय्य करते. शिवाय श्रीपार्श्वनाथ देवांवर अत्यंत श्रद्धा व अमर्याद पूज्यभाव ठेवणाऱ्या त्यांच्या अनेक शिष्यांपैकीं जितके देवगतीस गेले आहेत, ते सर्व देव सुद्धां प्रभूंच्या भक्तांना गुप्तपणें वरचें साहाय्य करितात— त्यांच्या अडचणी दूर करतात, त्यांना संकटापासून सोडवितात, त्यांचे मनोरथ पूर्ण करतात, धर्माचें आराधन करण्याची अनुकूलता करून देतात, वगैरे वगैरे. ह्यामुळेंच कित्येक लोक नवकार मंत्राच्या माळेप्रमाणें ' उवसग्गहरं 'च्या माळेचा जप करतात.
- सम्यक्त्वाची प्राप्ति व नंतर त्यास निर्मळ ठेवण्यासाठीं सतत प्रयत्न—ह्यांवर ह्या सूत्रांत पुष्कळच जोर ( भर ) देण्यांत आला आहे. ह्यावरून असें स्पष्ट होतें कीं, एखाद्यास समकिताची प्राप्ति करविणें, हें मोठ्या ( अपरंपार ) पुण्याचें काम आहे.
- मूर्तीच्या दर्शनानें समकिताची प्राप्ति होते; म्हणून अनेक भक्त दूर-दूरच्या यात्रा करावयास जातात, मूर्तीची अंजनशलाका ( प्राणप्रतिष्ठा ) व प्रतिष्ठा ( स्थानप्रतिष्ठा ) करवितात.
- समकिताच्या प्राप्तीनंतर श्रीवीतराग देवांबद्दल भक्ति उत्पन्न होते व भक्तीनें मुक्ति मिळते.
- श्रीपार्श्वनाथ देवांचीं इतकीं इतकीं चमत्कारपूर्ण तीर्थस्थानें आज विद्यमान असून सुद्धां मूर्ति न मानणारे पुष्कळसे लोक जगांत आहेत, हें एक मोठें नवलच आहे.
- मंत्रबळ सुद्धां आध्यात्मिक बळाचें एक पूरक तत्त्वच आहे, असें ह्या सूत्रानें सिद्ध होतें.

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — ' उवसग्गहरं ' शब्दाचा अर्थ सांगा.

लेला जीव वाईट विचार करील तर यो दुर्गतीसच जाणार. जर मरतेवेळीं समाधि–अवस्था ( समदृष्टि ) असेल तर जीवात्मा चांगल्या गतीस जातो व उत्तरोत्तर शुभ गति मिळाल्यानें तो मुक्तीच्याजवळ जातो व मुक्तही होतो — हेंच कारण आहे, हीच आत्म्याचें श्रेय करण्याची तीव्र इच्छा आहे कीं ज्यामुळें ह्या सूत्रांत समाधि-मरणाची मागणी केली आहे.

**प्रश्न ६** — कोणत्याही कर्माचा ( धार्मिक क्रियेचा ) संपूर्ण विधि येईपर्यंत, तीं कर्में ( त्या धार्मिक क्रिया ) अविधीनें करणें, हें कांहीं योग्य आहे कां ?

**उत्तर** — पोळी गोल करतां येत नाहीं म्हणून पोळीच करूं नये नि खाऊं नये, असें कोणी करतात कां ? वेडी-वांकडी लाटतां लाटतांच गोल पोळी लाटतां येते. विगारी इयत्तेंतील मुलांचीं वेडीं-वांकडीं अक्षरेंच गिरवून गिरवून व लिहून लिहून पुढें जातां मोत्याच्या दाण्यासारखीं होतात. शास्त्रांत देखील लिहिलें आहेः—

**अविहिकया वरमकयं, उस्सुअवयणं वयंति सव्वण्णू ।**
**पायच्छित्तं जम्हा, अकए गुरुअं कए लहुअं ॥**

भावार्थः- " अविधीनें करण्यापेक्षां न करणें श्रेष्ठ होय "— ह्या वचनास सर्वज्ञानी-केवळज्ञानी देवांनीं ' उत्सूत्रवचन ' म्हटलें आहे. धर्मक्रिया अजिबात न करणाऱ्यास मोठें प्रायश्चित्त व ( अविधीनें ) करणाऱ्यास लहान ( थोडें ) प्रायश्चित्त घ्यावें लागतें. ( अर्थात् अविधीनें देखील धार्मिक क्रिया केल्यानें पापांचा थोडा-फार नाश हा होतोच. )



# (१९) श्री अरिहंतचेइयाणं (चैत्यस्तव) सूत्र

## अन्वयार्थ

**अरिहंतचेइयाणं** - ( सर्वज्ञ प्रभु श्रीजिनेश्वर देवांच्या मूर्तींची जेथें स्थापना झालेली आहे, अशी जिनमंदिरें सुद्धां पूज्य-वंदनीय असल्यामुळें त्यांच्याकरितां व ) श्रीअरिहंत देवांच्या मूर्तीसमोर. **करेमि** - मी करतो. **काउस्सग्गं** - कायोत्सर्ग ( शरीरावरील ममत्वाचा त्याग करून, समत्वानें युक्त होऊन धर्म-ध्यान करतो ). [ १ ]. **वंदणवत्तियाए** - नमस्कार करण्याच्या हेतूनें. **पूअणवत्तियाए** - पूजा, सेवा, भक्ति वगैरे करण्याच्या हेतूनें. **सक्कारवत्तियाए** - सत्कार करण्याच्या हेतूनें. **सम्माणवत्तियाए** - ( खऱ्या अंतःकरणानें स्तुति, भजन वगैरे करून ) सन्मान करण्याच्या हेतूनें. **बोहिलाभवत्तियाए** - शुद्ध देव, गुरु नि धर्मावरील दृढ विश्वासरूपी बोधिबीजा ( सम्यक्त्वा )ची प्राप्ति व्हावी म्हणून. **निरुवसग्गवत्तियाए** - सर्व संकटांचा नि विघ्नांचा नाश करून उपसर्गरहितपणें देवाची आराधना ( सेवा-भक्ति ) करण्याच्या हेतूनें किंवा जेथें यत्किंचित् ही उपद्रव-त्रास नाहीं, अशा मोक्षाची प्राप्ति व्हावी म्हणून ( देवांच्या मूर्तीसमोर मी काउस्सग्ग करतो ). [ २ ]. **सध्दाए** - ( क्षणोक्षणीं वृद्धिंगत होणाऱ्या ) श्रद्धेनें. **मेहाए** - ( उत्तरोत्तर विकास पावणाऱ्या ) मेधा - निर्मळ बुद्धीनें. **धिईए** - ( अधिकाधिक वाढणाऱ्या ) धृति - स्थिर चिंतनानें युक्त किंवा कुशलता व सहनशीलतेनें परिपूर्ण अशा धैर्यानें. **धारणाए** - ( क्षणोक्षणीं वाढणाऱ्या ) धारणा-निर्मळ स्मृतीनें. **अणुप्पेहाए** - ( श्रीअरिहंत देवांच्या आठवणीनें वाढणाऱ्या ) तात्त्विक चिंतनानें ( ध्यानानें ). **वड्ढमाणीए** - वाढणाऱ्या, वृद्धिंगत होणाऱ्या ( वर सांगितलेल्या पांची भावनांनीं युक्त होऊन ). **ठामि** - मी

करतो. **काउस्सग्गं** – काउस्सग्ग – कायोत्सर्ग ध्यान. ( ' निरुवसग्गवत्तियाए ' पर्यंत ' करेमि काउस्सग्गं ' शीं व ' सद्धाए ' पासून पुढें ' ठामि काउस्सग्गं ' शीं संबंध–अन्वय आहे ). [ ३ ].

## सूत्रार्थ

**अरिहंतचेइयाणं करेमि काउस्सग्गं** – श्रीअरिहंत देवांच्या चैत्यां-मूर्तींसमोर ( काउस्सग्ग क्रिया करीत असतांना ही नमस्कार, पूजा, सत्कार वगैरे क्रियांच्या फळाबद्दल संपूर्ण आदर असल्यानें ह्या सर्व क्रियांपासून होणारी फलप्राप्ति व्हावी म्हणून ) मी शुभ ध्यान धरून काउस्सग्ग : कायोत्सर्ग करतो. [ १ ].

**वंदणवत्तियाए पूअणवत्तियाए** – शुद्ध ( निर्मळ ) अंतःकरणानें श्रीतीर्थंकर देवांच्या चैत्यांना ( = मंदिरांना व मूर्तींना ) नमस्कार केल्यानें जें फळ प्राप्त होतें; तें फळ प्राप्त व्हावें, ह्या हेतूनें, ( पूजा, सत्कार वगैरे क्रियांतसुद्धां असाच स्पष्टार्थ समजावा. ) देवांची पूजा करण्याच्या हेतूनें,

**सक्कारवत्तियाए सम्माणवत्तियाए** – अलंकार वस्त्र वगैरेंनीं सत्कार आणि स्तुति, भजन, कीर्तन वगैरेंनीं सन्मान करण्याच्या ( = केल्यानें जें फळ मिळतें, तें फळ ह्या काउस्सग्गानें मिळावें अशा ) हेतूनें,

**बोहिलाभवत्तियाए निरुवसग्गवत्तियाए** – सम्यक्त्वाची ( बोधिबीजाची ) प्राप्ति व्हावी किंवा त्यांत स्थिर होता यावें म्हणून आणि त्रास किंवा दगदग झाल्याशिवाय जिन धर्माची प्राप्ति होण्यासाठीं अथवा कोणत्याही उपद्रवांशिवाय–अडचणींवांचून धर्माराधन करतां यावें म्हणून अथवा सर्व उपद्रवांनीं रहित अर्थात् संपूर्ण सुखांनीं परिपूर्ण अशा मोक्षाची प्राप्ति व्हावी अशा भावनेनें ( मी काउस्सग्ग ध्यान धरतो. ) [ २ ].

**सद्धाए मेहाए धिईए** – (ज्या साधनांमुळें–प्रकारांमुळें काउस्सग्ग सफळ–उत्तम फळ देणारें होतें, तीं साधनें–करणें सांगितलीं जातं

आहेत: ) क्षणोक्षणीं वृद्धिंगत होणाऱ्या श्रद्धेनें, निर्मळ अशा बुद्धीनें धृतीनें–धैर्यानें ( अर्थात् मनास चंचळ केल्याशिवाय, स्थिरचित्तानें ),

**धारणाए अणुप्पेहाए वड्ढमाणीए** – उत्तरोत्तर वाढणाऱ्या श्री अरिहंत देवांच्या गुणांच्या धारणेनें–निर्मळ स्मृतीनें आणि वारंवार देवांच्या गूढ गुणांच्या सखोल चिंतनानें ( 'वड्ढमाणीए' म्हणजे क्षणोक्षणीं वृद्धिंगत होणाऱ्या किंवा वाढणाऱ्या भावनेनें–मनोवृत्तीनें ह्याचा संबंध 'सद्धाए' वगैरे पांची पदांशीं आहे अर्थात् हें त्या पांच पदांचें विशेषण आहे ).

**ठामि काउस्सग्गं** – मी कायोत्सर्ग करतो, काउस्सग्ग ध्यान धरतो. [ ३ ].

## भावार्थ

ह्या सूत्रांत श्रीअरिहंत देवांच्या मूर्तींना नमस्कार, ( त्यांची ) पूजा, ( त्यांचा ) सत्कार आणि सन्मान करण्याची संधि सांपडते. देवांना नमस्कार वगैरे केल्यानें बोधिबीज ( सम्यक्त्व ) व मोक्ष यांची प्राप्ति होते; म्हणून क्षणोक्षणीं उत्तरोत्तर वृद्धिंगत होणाऱ्या श्रद्धा, निर्मळ बुद्धि, धृति–धैर्य, धारणा–निर्मळ स्मृति व विचारणा ( तत्त्वचिंतन ) — ह्या पांची भावनांनीं–मनोवृत्तींनीं युक्त होऊन मी काउस्सग्ग करतो. ( किंवा ) ह्या पांची भावनांची वृद्धि व्हावी म्हणून मी स्वतःचें शरीर एकाच जागीं स्थिर करून, आणि मौन धारण करून शुभ ध्यानासह ह्या 'चैत्यस्तव' सूत्रानें ( हें सूत्र म्हणून ) कयोत्सर्ग करतो, असा गूढ भाव ह्या सूत्रांतून प्रगट होतो.

## परिमल

※ मुकुट, अलंकार ( दागिने ) वगैरेंनीं श्रीजिनमूर्तींचा सत्कार करणें, ही गोष्टही शास्त्रशुद्धच आहे. ह्यास प्रमाण म्हणून ह्या 'अरिहंतचेइयाणं' सूत्राचा निर्देश करतां येईल.

✲ समवसरणांत देशना ( उपदेश ) देणारे देव ' भाव तीर्थंकर ' होत. समवसरणांत देशना देण्यासाठीं श्रीतीर्थंकर प्रभु पूर्वेकडे तोंड करून बसतात. इतर तीन दिशांत तर देवलोक प्रभूंच्या ( अगदीं प्रभूंच्या सारख्याच ) तीन मूर्तींची स्थापना करितात. मूर्ति न मानणारे लोक सुद्धां ह्या मूर्तींना तर पूज्य-वंदनीयच मानतात. तर मग मंदिरांत स्थापना केलेल्या श्रीअरिहंत देवांच्या मूर्तींना न मानणारे सत्याचा द्रोह किंवा असदाग्रह ( दुराग्रह ) च करितात, असें म्हणतां येईल.

✲ मंदिरांत ज्या देवांच्या मूर्ति असतात, त्या ' स्थापना जिन ' होत. ह्या सूत्रानें मंदिरांत स्थापन केलेल्या श्रीजिनेश्वर देवांच्या मूर्तींची भक्ति ( पूजा, सत्कार वगैरे ) केली जाते, यामुळें मूर्ति व मूर्तिपूजा शास्त्रसिद्ध होते.

✲ देवांच्या मूर्तींची भक्ति ( – नमस्कार, पूजा, सत्कार वगैरे ) केल्यानें जें फळ प्राप्त होतें, तें फळ प्राप्त करण्यासाठीं श्रद्धा, धैर्य वगैरेंनीं युक्त होऊन ह्या सूत्राद्वारें काउस्सग्ग केला जातो आणि हें काउस्सग्ग ध्यान सफल झाल्यानें देवाची भक्ति दृढ होते— देवास नमस्कार करणें, देवाची पूजा करणें वगैरेंवरील आदरभाव दृढ होतो.

✲ प्रत्येक वस्तु १. नाम २. स्थापना ३. द्रव्य व ४. भाव- ह्या चार निक्षेपांनीं सिद्ध होते ( पूर्णपणें समजली जाते ). देहरावासी ( किंवा देरावासी ) व स्थानकवासी ह्या दोघांनाहि श्री अनुयोगद्वार वगैरे शास्त्रें मान्य ( संमत, प्रमाणभूत ) आहेत आणि स्थापना निक्षेपानें सिद्ध होणारी जिनमूर्ति ह्या शास्त्रप्रमाणेंच आहे; म्हणून जिनपूजा अविच्छिन्नरूपानें प्रचलित ( चालू ) ही आहेच.

✲ ह्या सूत्रांतून आपणास खालील अमृत-बिन्दु प्राप्त होतात— ( १ ) आपणास प्राप्त झालेले सम्यक्त्व-रत्न श्रीजिनेश्वर देवांच्या मूर्तीला नमस्कार केल्यानें निर्मळ होतें, राहूं शकते. ( २ ) मूर्तीच्या समोर देखील काउस्सग्ग करतां येतो. ( ३ ) स्वतःची आध्यात्मिक उन्नति करणाऱ्या प्रत्येकानें रोज मूर्तिपूजा ही केलीच पाहिजे. ( ४ ) ( विधिपूर्वक ) स्थापना केलेल्या मूर्तीला नमस्कार वगैरे केल्यानें कर्मांचा नाश होतो. ( ५ ) पाषाणाच्या मूर्तींची प्राणप्रतिष्ठा केली जाते ( उदा.– जसे आपल्या शरीरांत प्राण असतात ),

तेव्हां ती मूर्ति पूज्य-वंदनीय व प्राणवान (प्रभावशाली) होते आणि म्हणूनच 'जिनप्रतिमा जिनसारिखी' असें म्हटलें जातें.

※ श्रद्धा वगैरे भक्तिभाव सुचविणाऱ्या शब्दांमुळें एक गोष्ट स्पष्ट होते, ती अशी कीं, मीं हें काउस्सग्ग ध्यान बळजवरीनें, फायदा किंवा नुकसानाचा विचार केल्याशिवाय, चंचलतेनें (अस्थिर स्वभावानें किंवा मनानें) किंवा लोभाच्या खोट्या आशेमुळें करीत नाहीं. श्रद्धा वगैरेंनीं श्रीवितराग देवांच्या गुणांना समजून (त्यांचे दिव्य गुण पाहून माझ्या मनाला तेथें विश्रांति मिळते म्हणून) त्यांचें स्मरण-चिंतन (ध्यान) करून मी हें काउस्सग्ग ध्यान धरीत आहे.

## सरळ प्रश्नोत्तरें

**प्रश्न १** — 'अरिहंतचेइयाणं सूत्रा'चें दुसरें नांव काय आहे? तें केव्हां म्हटलें जातें?

**उत्तर** — ह्या सूत्राचें दुसरें नांव '**चैत्यस्तव**' आहे. चैत्यवंदनाची क्रिया करतांना 'जय वीयराय सूत्र' म्हटल्यानंतर आणि काउस्सग्ग करण्यापूर्वीं हें सूत्र म्हटलें जातें.

**प्रश्न २** — चैत्यवंदनांतील काउस्सग्गाचें प्रमाण किती असतें?

**उत्तर** — चैत्यवंदनांतील काउस्सग्ग ध्यान एका नवकाराचेंच असतें.

**प्रश्न ३** — काउस्सग्गाच्या शेवटीं (काउस्सग्ग पूर्ण करतांना) काय म्हटलें जातें?

**उत्तर** — काउस्सग्गाच्या शेवटीं श्रीअरिहंत देवांना नमस्कार करण्यासाठीं 'नमो अरिहंताणं' म्हणून 'नमोऽर्हत्' आणि थोय (स्तुति) म्हणावी. चैत्यवंदन करतांना हें 'अरिहंतचेइयाणं सूत्र' उभे राहून म्हटलें जातें.



**उत्तर** — ह्या सूत्राच्या पहिल्या गार्थेत ( १ ) श्रीऋषभदेवस्वामी ( २ ) श्रीशांतिनाथ ( ३ ) श्रीनेमिनाथ ( ४ ) श्रीपार्श्वनाथ प्रभु व ( ५ ) श्रीमहावीरस्वामी — ह्या पांच तीर्थंकर देवांची स्तुति केली आहे.

**प्रश्न २** — थोय म्हणजे काय ? त्यांत किती गाथा असतात ?

**उत्तर** — थोय म्हणजे स्तुति, प्रार्थना. चार गाथा मिळून एक थोय बनते. अर्थात् उक्तक्रमानुसार चार गाथा एकत्र झाल्या म्हणजे त्यांस थोय म्हटलें जातें. देववंदन करतांना देवापुढें थोय म्हटली जाते.

**प्रश्न ३** — थोयेंतील चाऱ्ही गाथेंचा संबंध ( क्रम ) समजावून सांगा.

**उत्तर** — ज्यांचें मात्र दर्शनच झाल्यानें भक्तीचा प्रवाह ओसंडूं लागतो, अशा ( स्वतःच्या इष्ट ) देवांची ( किंवा ज्या देवापुढें स्तुति करावयाची असेल त्या देवांची ) स्तुति **पहिल्या गार्थेत**; नंतर सर्व तीर्थंकर देव गुणांनी सारखेच आहेत, असें दाखविण्यासाठीं सर्व तीर्थंकर देवांची ( समष्टिरूपांत ) स्तुति **दुसऱ्या गार्थेत**; त्यानंतर त्या वीतरागी देवांनीं सांगितलेले सिद्धांतच सत्य मार्ग दाखविणारे असल्यानें ज्ञानाची स्तुति ( थोरवी ) **तिसऱ्या गार्थेत**; आणि शेवटीं त्या श्रुतज्ञानाची दात्री आणि अधिष्ठात्री अशा श्रुतदेवीची स्तुति ( प्रार्थना ) शेवटच्या **चौथ्या गार्थेत** — अशा प्रकारें ह्या थोयेंत ( स्तुतींत ) चाऱ्ही गाथाचा संबंध गोफा-प्रमाणें सुंदर रितीनें गुंफलेला अगदीं स्पष्ट दिसून येतो.



# (११) श्री संसारदावानल स्तुति

## ( श्रीमहावीरस्वामी देवांची स्तुति )

## अन्वयार्थ

**संसार** - जेथें जन्म-मरणाचें चक्र ( रहाट गाडगें ) चालूच आहे, अशा संसाररूपी. **दावानल** - वणव्याच्या ( अग्नीच्या ज्वालामान

आणि पराकाष्ठेच्या स्वरूपास दावाग्नि–दावानल अर्थात् वणवा असें म्हणतात ). **दाह** – ज्वाळेनें पोळल्यामुळें होणाऱ्या आगेस ( दाहास शमविण्यासाठीं ). **नीरं** –जे पाण्याप्रमाणें आहेत, अशा. **संमोह** –महामोहरूपी, महा अज्ञानरूपी. **धूली** – धुळीस. **हरणे** – दूर करण्यासाठीं, उडविण्यासाठीं. **समीरं** – जे सोसाट्याच्या वाऱ्यासारखे आहेत, अशा. **माया**–माया, कपट–प्रपंचरूपी. **रसा** – पृथ्वीस, जमिनीस. **दारण** – खोदण्याच्या कामीं. (खोदून–नांगरून निष्प्रपंच–सरळ–सपाट करण्यासाठीं ). **सार** – जे तीक्ष्ण धारवाल्या. **सीरं** – नांगरासारखे आहेत, अशा. **नमामि** – मी नमस्कार करतो. **वीरं** – श्रीमहावीरस्वामी देवांना. **गिरिसार** – सर्व पर्वतांत श्रेष्ठ अशा मेरु पर्वतासारख्या. **धीरं** – धीर–धैर्यसंपन्न किंवा अचल अशा ( श्रीवीर देवांना ). [ १ ]. **भाव** – भक्तिभावानें, खऱ्या अंतःकरणानें. **अवनाम** – नमस्कार करणाऱ्या. **सुर** – वैमानिक देव. **दानव** – भवनपति वगैरे दानव. **मानव** – आणि मनुष्यांच्या. **इन** – अधिपतींच्या, पुढाऱ्यांच्या. **चूला** – मुकुटांत किंवा किरीटांत असलेल्या. **विलोल** – चंचल ( अर्थात् हालल्यामुळें सुंदर दिसणाऱ्या ). **कमल** – कमळांच्या. **आवलि** – मालिकेनें. **मालितानि** – सुशोभित, मनोहर. अशा ( हें संपूर्ण पद 'जिनराजपदानि' चे विशेषण आहे ). **संपूरित** – अगदीं उत्तम प्रकारें परिपूर्ण केले आहेत. **अभिनत** – खऱ्या अंतःकरणानें नमस्कार करणाऱ्या. **लोक** – भक्तांचे. **समीहितानि** – मनोरथ, ज्यांनीं, अशा. **कामं** – अत्यंत, खऱ्या हृदयानें. **नमामि** – मी नमस्कार करतो. **जिनराज** – सर्व श्रीजिनेश्वर देवांच्या. **पदानि** – चरणारविंदांना. **तानि** – त्या. [ २ ]. **बोधागाधं** – अपार – अनंत ज्ञानामुळें जो अगाध – गंभीर आहे ( अर्थात् अनंत ज्ञान हेंच आगमरूपी समुद्राची गंभीरता, खोली किंवा अगाधपणा होय. ). **सुपद** – अनेकांतवादाच्या सुरम्य–मनोहर अशा

पदांच्या. **पदवी** – रचनारूपी. **नीरपूर** – विशाल जलप्रवाहानें तुडुंब भरलेला असल्यामुळें. **अभिरामं** – जो अत्यंत सुंदर–मनोहर दिसतो, अशा. **जीवाहिंसा** – साही जीवनिकायांच्या अहिंसारूपी. ( अहिंसेच्या अनेक प्रकारच्या वर्णनरूपी ). **अविरल** – ( 'विरल' म्हणजे तुरळक-तुरळक, वेगवेगळें; अर्थात् 'अविरल' म्हणजे ) अविच्छिन्नरूपानें वाहणाऱ्या. **लहरी** – ( 'अहिंसा परमो धर्मः'च्या ) लाटांच्या. **संगम** – संगमानें, एक दुसऱ्यास मिळण्यानें. **अगाह** – विशाल, अगाध, अवाढव्य ( सामान्य बुद्धीच्या माणसास ज्याचें ज्ञान होऊं शकणार नाहीं, असें ). **देहं** – ज्याचें शरीर अर्थात् स्वरूप आहे, अशा. **चूला** – सिद्धांताच्या चूलिकाच. **वेलं** – ज्यांची दोन्ही तटें आहेत किंवा ज्याची भरती–ओहोटी आहे, अशा. **गुरु** – मोठमोठ्या गूढ अर्थांनीं परिपूर्ण अशा. **गम** – पाठरूपी, आलापकरूपी. **मणि** – किमती रत्नांनीं, मण्यांनीं. **संकुलं** – जो अगदीं भरलेला आहे, अशा. **दूरपारं** – आणि ज्याचें दुसरें तट अत्यंत दूर आहे अर्थात् ज्याच्या पैल तिरीं जाणें फारच अवघड आहे, अशा. **सारं** – प्रधान, मुख्य. **वीरागम** – श्रीवीर प्रभुद्वारा प्ररूपित ४५ आगम–सिद्धांतरूपी. **जलनिधिं** – ( ज्ञान ) महासमुद्राची. **सादरं** – आदरानें, मान–पानानें, खऱ्या हृदयानें. **साधु** – उत्तम प्रकारें. **सेवे** – मी सेवा–भक्ति करतो. [ २ ]. **आमूल** – अगदीं खोल असलेल्या मुळापासूनच. **आलोल** – हालणाऱ्या. आणि **धूली** – मकरंद किंवा केसराच्या परागाच्या **बहुल** – अत्यंत ( अर्थात् उत्तम अशा ). **परिमल** – सुवासामुळें. **आलीढ** – आसक्त ( अर्थात् त्या सुवासाचा स्वाद घेण्यांत गुंग ) झालेल्या. **लोल** – चंचल ( किंवा सुंदर ). **अलि** – भुंग्यांच्या. **माला** – मालिकांच्या. **झंकार** – गुंजारवाच्या. **आराव** – मधुर गोड ध्वनीनें. **सार** – श्रेष्ठ किंवा उत्तम ( अर्थात् सुशोभित, सुवासित ) अशा. **अमल** – आणि निर्मळ किंवा अगदीं स्वच्छ. **दल** – पाकळ्या असलेल्या.

परिपूर्ण असल्यामुळें ) चूलिका ह्या ज्याचे दोन्ही तट–कांठ किंवा ज्याची भरतीच आहे; मोठ–मोठे आलापक हे ज्याच्या अगदीं तळाशीं–सखोल जागीं असलेलीं महार्ह–किमती किमती रत्नें असून त्या रत्नांनीं जो अगदीं व्याप्त आहे आणि मोठ–मोठया गूढ रहस्यामुळें किंवा अनंत ( वेगवेगळ्या) अर्थांमुळें ज्याला पार करणें ( ज्याच्या पैलतीरीं जाणें ) फारच अवघड – अत्यंत कठिण आहे, अशा ( सिद्धांत–महासागरास, आगम–समुद्रास )

**सारं वीरागमजलनिधिं सादरं साधु सेवे** – श्रीमहावीर देवांच्या शासनाचें प्रधान अंग अशा आगामरूपी महासमुद्राची मी आदरानें व उत्तम प्रकारें ( खऱ्या अंतःकरणानें ) सेवा–भक्ति करतो. [ ३ ].

**आमूलालोलधूलीबहुलपरिमलालीढलोलालिमाला,-झंकारारावसारामलदलकमलागारभूमिनिवासे !** – मुळापर्यंत ( अर्थात् मुळापासूनच ) हालणाऱ्या आणि चंचल अशा कमळांतून गळणाऱ्या ) परागाच्या अत्यंत ( सुंदर, गोड ) सुगंधामुळें आकर्षित होऊन त्यांतच ( त्याचा रसास्वाद घेण्यांतच अगदीं ) गुंग ( गर्क ) झालेल्या भुंग्यांच्या मालिकांच्या गुंजारवाच्या गोड आवाजानें श्रेष्ठ ( सुशोभित अर्थात् सुघोषित ) अशा आणि अगदीं स्वच्छ पाकळ्या असलेल्या कमळरूपी घराची जमीन हीच जिचें निवासस्थान आहे अशी अर्थात् कमळाच्या घरांत राहणारी, ( हे श्रुतदेवी ! )

**छायासंभारसारे ! वरकमलकरे ! तारहाराभिरामे !** – सौंदर्य नि कांतीची जणूं कांहीं खाणच असल्यामुळें अत्यंत सुंदर शरीरामुळें ) चित्ताकर्षक अशी, हातांत अत्यंत सुंदर असें कमळ धारण करणारी, शुभ्र नि देदीप्यमान माळा घातल्यामुळें जिच्या शरीराचे सर्व अवयव फारच सुंदर ( शोभून ) दिसत आहेत, अशी

**वाणीसंदोहदेहे ! भवविरहवरं देहि मे देवि ! सारं** – आणि द्वादशांगी वाणीच जिचें विराट स्वरूप–शरीर आहे, अशी हे श्रुतदेवी !

ज्यांत जन्म-मरणरूपी संसारचक्राचा विरह ( अर्थात् नाश ) होतो, अशा सर्वोत्तम मोक्षसुखाच्या प्राप्तीचें वरदान ( अर्थात् मोक्ष ) मला दे. किंवा ( ह्या स्तुतीचे कर्ते परमोपकारी आचार्यदेव श्रीहरिभद्रसूरीश्वर महाराजांनीं 'भवविरह' शब्दानें स्वतःचें नांव सुचविलें आहे; म्हणून ) स्तुतीच्या कर्त्या कर्ताला सर्वोत्तम असें मोक्ष दे. [ ४ ].

## भावार्थ

थोयेंत ( स्तुतींत ) चार गाथा ( कडवीं ) असतात, त्याप्रमाणें ह्या स्तुतींत सुद्धां आहेतच. ही स्तुति बहुतकरून अष्टमीस संध्याकाळच्या प्रतिक्रमणाच्या वेळीं, चतुर्दशीचें पक्खी ( पाक्षिक ) प्रतिक्रमण करतांना आणि स्त्रियांत संध्याकाळच्या देवसि प्रतिक्रमणांत साही आवश्यकें पूर्ण झाल्यानंतर सामुदायिकरूपांत म्हटली जाते. यकिनीमहात्तरा-धर्मसूनु ह्या नांवानें सुद्धां प्रसिद्ध असलेले परमोपकारी आचार्यदेव श्रीहरिभद्रसूरीश्वर महाराज ह्या स्तुतीचे कर्ते होत. श्रीदेवर्द्धिगणि व श्रीजिनभद्रगणि क्षमाश्रमणांच्या जवळ जवळ समकालीं ( अर्थात् त्यांच्या नंतर फक्त पंचवीसेक वर्षे झाल्यानंतर ) अंदाजें १५०० वर्षांपूर्वी पूर्वांचें ज्ञान अगदीं नष्टप्राय झालें होतें, त्यासुमारास ह्या महापुरुषाचा-आचार्यदेवांचा जन्म झाला. ते जातीचे ब्राह्मण असल्यामुळें वेद-वेदांतांत अत्यंत निष्णात होते. त्यांनीं मोठेपणीं ( उतारवयीं ) दीक्षा घेतली होती. बौद्धांनीं स्वतःच्या दोन शिष्यांना देहांतशिक्षा ( देहांत प्रायश्चित्त ) दिलेली पाहून बदला म्हणून ( सूडबुद्धीनें ) त्यांनीं १४४४ बौद्धांचा पार निकाल लावण्याचें ठरविलें. परंतु लवकरच 'स्वतःकडून हें दुष्ट चिंतन झालें,' असें लक्षांत येतांच त्यांनीं बौद्धांवर दया केली ( त्यांना क्षमा केलें ) व स्वतः प्रायश्चित्त म्हणून १४४४ ग्रंथ रचण्याचा निश्चय केला. त्यांत १४४० ग्रंथांची रचना तर झाली, पण नंतर शरीर थकल्यामुळें ( प्रकृति खालावल्यामुळें ) ४ ग्रंथ बनविण्याचे बाकी राहिले, तेव्हां ४ ग्रंथांच्या जागीं त्यांनीं ह्या स्तुतीच्या ४ गाथा केल्या. ( अशी सुद्धां

आख्यायिका आहे कीं शेवटच्या गाथेचें-कडव्याचें पहिलें चरण बनविल्यानंतर त्यांची बोलण्याची शक्ति नाहीशी झाली; त्यामुळें त्यांच्या अभिप्रायाप्रमाणें श्री संघानें ' झंकाराराव ' पासून गाथा पूर्ण केली ) अशाप्रकारें ग्रंथांची १४४४ ही संख्या पूर्ण झाली व ते देह त्याग करून स्वर्गाला गेले. १४४४ ग्रंथांत त्यांनी पुष्कळशा आगमांच्या टीका व मोठमोठे स्वतंत्र ग्रंथ सुद्धां लिहिले आहेत. ह्या स्तुतीची भाषा सम-संस्कृत-प्राकृत आहे. प्रत्येक गांवीं मोठ्या प्रतिक्रमणाच्या वेळीं उपद्रवांच्या निवारणासाठीं श्री संघ ( समस्त) ही शेवटची गाथा ' झंकाराराव ' पासून पूर्ण होईपर्यंत सामुदायिक रूपानें व उच्च स्वरांत ( मोठ्या आवाजांत ) म्हणतो, अशी प्रथा आहे.

## परिमल

ह्या स्तुतींत आपणास जैन दर्शनाच्या अनेक गुणगरिष्ठ मान्यतांचें दर्शन होतें. उदा० — ( १ ) जन्म-मरणरूपी संसार हा महा देदीप्यमान वनव्याच्या उष्णतेसारखा किंवा दाहासारखा असून श्रीमहावीर देव त्याला शांत करणाऱ्या मेघासारखे ( ढगासारखे ) आहेत. ही उपमा अगदी सयुक्तिक आणि संघटित ( बरोबर ) आहे. ( २ ) दुसऱ्या गाथेंतील-कडव्यांतील एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट — श्रीजिनेश्वर देव संसारी लोकांहून अगदीं संपूर्णपणें वेगळे असून सुद्धां भक्तांचे मनोरथ ( सदिच्छा ) पूर्ण करतात. अर्थात् जर दुःखी जीव श्रीवीतरागी देवांचा आश्रय करतील ( त्यांना शरण जातील ), तर त्यांच्या सर्व विघ्नांचा, उपद्रवांचा नि दुःखांचा नाश होऊं शकतो; म्हणून जो अत्यंत दुःखी असेल, त्यास श्रीकेवळज्ञानी देवांना शरण जाण्याची आवश्यकता आहे. ( ३ ) देवांची द्वादशांगी वाणी ही अगाध महासागरासारखी गंभीर आहे. तिच्या सर्व उपमा तिच्या ( ज्ञानाच्या ) गाथेंत-श्लोकांत अगदीं स्पष्ट समजाविल्या आहेत. त्या सर्व उपमांवर खोल चिंतन करण्याची जरूर आहे. सामान्य ( पाण्याच्या ) समुद्राप्रमाणें ज्ञान-सागराच्या लाटा कोणत्या ? त्यांतील रत्नें कोणती ? हें कोणतें ( कोण-कोणत्या विषयाचें ) ज्ञान आहे ? त्या-

पासून फायदा काय? वगैरे अनेक गोष्टींची माहिती आपणांस ह्या गाथेंतून-श्लोकांतून मिळूं शकते. (४) संपूर्ण द्वादशांगी वाणी हीच जिचें विराट स्वरूप आहे, अशी देवी म्हणजे श्रुतदेवी शारदादेवी अर्थात् सरस्वती होय. असें वर्णन केलें असल्यामुळें सम्यग्ज्ञानाचें अतुल ऐश्वर्य आपल्या अगदीं नीट लक्षांत येतें.

❋ ह्या स्तुतीच्या तिसऱ्या गाथेंतील एक गूढ तत्त्व (रहस्य) — जगांतील दुसरे लोक नारळी पौर्णिमेच्या (श्रावण शु. १५) दिवशीं समुद्र-पूजन करतात, नारळ सोडतात; तर जैन सिद्धांतांत सत्यस्वरूप ज्ञानमहासागराची सेवा-पूजा आणि भक्ति करण्याचें विधान आहे — "मी आगमजल-निधीची सेवा-भक्ति करतो."

❋ संसारी जीवांच्या मागें कांहींना कांहीं त्रास असतोच — आधि, व्याधि नि उपाधि ह्या त्यांच्या मागें लागलेल्या असतातच. ह्या त्रिविध तापासच ज्ञानी पुरुष दावाग्नि-वणवा असें म्हणतात. श्रीवीतरागी देवांच्या सेवेनें-भक्तीनें हा त्रिविध संताप शांत (नष्ट) होतो; म्हणूनच श्रीजिनेश्वर देवांची सेवा-भक्ति केली पाहिजे — असा भाव ह्या स्तुतीच्या अगदीं पहिल्या पदांतूनच निघतो.

## सरळ प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — 'संसारदावानल' स्तुतीचे कर्ते कोण आहेत?

उत्तर — १४४४ ग्रंथांची रचना करणारे परमोपकारी आचार्यदेव श्रीहरिभद्रसूरीश्वर महाराज ह्या स्तुतीचे कर्ते होत. ह्या स्तुतींत संस्कृत नि प्राकृत ह्या दोन्ही भाषांच्या एकसारख्या रूपांचा (शब्दांचा) प्रयोग केला आहे. आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं, ही स्तुति एक प्रादा-दिक काव्य असून सुद्धां ह्यांत एक देखील जोडाक्षर नाहीं. अशी कृति-कविता अगदीं कचित्च पाहाण्यांत येते.

प्रश्न २ — 'संसारदावानल' स्तुतीचें सार थोडक्यांत लिहा.

उत्तर — 'संसारदावानल' स्तुतीच्या पहिल्या गाथेंत श्रीमहावीरस्वामी

। स्तुति असून नंतरच्या तीन गाथांत अनुक्रमें सर्वजिन, जिनागम
ज्ञनदेवी यांची स्तुति आहे.

श्न ३ — 'संसारदावानल' स्तुति केव्हां म्हटली जाते ?

त्तर — ही स्तुति (१) बहुतांशीं अष्टमीच्या दिवशीं प्रतिक्रमणांत
म्हणून (२) पाक्षिक वगैरे मोठ्या प्रतिक्रमणांत सज्झाय (स्वाध्याय)
व (३) स्त्रियांत रोजच्या प्रतिक्रमणांत 'नमो ऽ स्तु' च्या जागीं
। जाते.

श्न ४— येथें श्रुतदेवीस नमस्कार का केला आहे ?

त्तर — ह्या स्तुतींत श्रुतदेवीला नमस्कार करण्यांत आलेला नसून
वळ फक्त प्रार्थनाच केली आहे. विरतिसंपन्न साधु महाराज प्रति-
ांत सुद्धां अविरतींत (अव्रती अवस्थेंत) असलेल्या देवीस नमस्कार
शकत नाहींत, परंतु ही देवी वरदान देण्यास समर्थ असल्यानें तिच्या
मोक्षप्राप्तीसाठीं फक्त प्रार्थनाच करण्यांत आली आहे. ह्या कारणा-
ही चौथी गाथा पूज्य साधु-साध्वीजी महाराज सुद्धां म्हणूं शकतात,
ास्त्रांत सांगितलें आहे.



 **विनंति** 

ह्यानंतर श्री नवकार महामंत्रापासून श्री संसारदावानल स्तुती-
ंतचीं मूळ सूत्रें पाठ करण्यासाठीं सोपें जावें म्हणून दिलीं आहेत.
ंतु छापण्याच्या सोयीकरितां त्या पानांना रोमन नंबर I ते XIV
ले आहेत, तरी त्या पानांचे नंबर अनुक्रमें १२१ ते १३४ समजावे.

— प्रकाशक

श्री नवकार मंत्रापासून श्री संसारदावानल स्तुतीपर्यंत



## मूळ सूत्रें

### ★ १. श्री नवकार मंत्र ★

नमो अरिहंताणं । नमो सिद्धाणं । नमो आयरियाणं । नमो उवज्झायाणं । नमो लोए सव्वसाहूणं । एसो पंचनमुक्कारो, सव्वपावप्पणासणो । मंगलाणं च सव्वेसिं, पढमं हवइ मंगलं ॥

### ★ २. श्री पंचिंदिय सूत्र ★

पंचिंदियसंवरणो, तह नवविहबंभचेर-गुत्तिधरो । चउविहकसायमुक्को, इय अट्ठा-रसगुणेहिं संजुत्तो ॥ १ ॥ पंचमहव्वयजुत्तो, पंचविहायारपालणसमत्थो । पंचसमिओ तिगुत्तो, छत्तीसगुणो गुरु मज्झ ॥ २ ॥

### ★ ३. श्री खमासमण सूत्र ★

इच्छामि खमासमणो ! वंदिउं जावणि-

ज्जाए निसीहिआए । मत्थएण वंदामि ।

★ ४. श्री इच्छकार सूत्र ★

इच्छकार सुहराई (सुहदेवसि), सुखतप, शरीर निराबाध, सुखसंजमजात्रा निर्वहो छोजी ? स्वामी ! शाता छेजी ? भात-पाणीनो लाभ देजोजी ।

★ ५. श्री इरियावहियं सूत्र ★

इच्छाकारेण संदिसह भगवन् ! इरिया-वहियं पडिक्कमामि ? इच्छं । इच्छामि पडिक्कमिउं इरियावहियाए विराहणाए । गमणागमणे । पाणक्कमणे बीअक्कमणे हरियक्कमणे ओसा-उत्तिंग-पणग-दग-मट्टी-मक्कडासंताणासंकमणे । जे मे जीवा विराहिया । एगिंदिया, बेइंदिया, तेइंदिया, चउरिंदिया, पंचिंदिया । अभिहया, वत्तिया, लेसिया, संघाइया, संघट्टिया, परियाविया,

किलामिया, उद्दविया, ठाणाओ ठाणं संकामिया, जीवियाओ ववरोविया तस्स मिच्छा मि दुक्कडं ।

★ ६. श्री तस्स उत्तरी सूत्र ★

तस्स उत्तरीकरणेणं, पायच्छित्तकरणेणं विसोहीकरणेणं, विसल्लीकरणेणं, पावाणं कम्माणं निग्घायणट्ठाए ठामि काउस्सग्गं ।

★ ७. श्री अन्नत्थ सूत्र ★

अन्नत्थ ऊससिएणं, नीससिएणं, खासिएणं, छीएणं जंभाइएणं, उड्डुएणं, वायनिसग्गेणं, भमलीए, पित्तमुच्छाए । सुहूमेहिं अंगसंचालेहिं, सुहूमेहिं खेलसंचालेहिं, सुहूमेहिं दिट्ठिसंचालेहिं । एवमाइएहिं आगारेहिं अभग्गो, अविराहिओ हुज्ज मे काउस्सग्गो । जाव अरिहंताणं भगवंताणं नमुक्कारेणं न पारेमि, ताव कायं ठाणेणं

अशा आशयानें ते एखाद्या अतिथीची वाट पाहूं (प्रतीक्षा करूं) लागलें. इतक्यांत कोणी साधु महाराज समोरूनच येत असलेले दिसले. साधु महाराज कांहीं कारणामुळें (मागें-पुढें झाल्यानें) स्वतःच्या संघापासून-सोबतीपासून वेगळे पडून रस्ता चुकलें होतें. नयसारांनीं त्यांच्याजवळ जाऊन विनंति केली — "अहो गुरु महाराज! आपण येथें निर्जन व अगदीं भयंकर अरण्यांत कसे? माझ्या बरोबर चला नि मला भिक्षेचा लाभ देऊन कृतार्थ करा." साधु महाराजांना भिक्षेसाठीं घेऊन जात असतांना संघापासून वेगळे पडून रस्ता चुकल्याचें समजल्यावर नयसार म्हणाले — "आपण भिक्षा (गोचरी) घेऊन ग्रहण करा, नंतर मी आपणास बरोबर असलेल्या रस्त्यावर नेऊन सोडीन व (त्या रस्त्यानें पुढें जातां जातां) आपली आपल्या संघाशीं भेट होईल." ऐन मध्याह्नाची वेळ व योग्य व्यक्तीची विनंति ह्या दोन्ही अनुकूळ गोष्टी पाहून साधु महाराजांनीं गोचरीचा लाभ दिला. भिक्षा ग्रहण केल्यानंतर मुनिराज विहार करण्यासाठीं निघाले, तेव्हां नयसार सुद्धां त्यांना निरोप देण्यासाठीं व बरोबर असलेला रस्ता दाखविण्यासाठीं त्यांच्या बरोबरच निघाले. रस्त्यांत प्रसंगोचित उपदेश देतांना मुनिराज म्हणाले — "हे भाग्यशाली जीवा! हा द्रव्यमार्ग दाखविण्यांतही तुला बराच फायदा झाला आहे; परंतु मुक्तीचा भावमार्गच प्राप्त करण्यास सर्वथैव योग्य (सर्वश्रेष्ठ) आहे. **सुदेव, सुगुरु आणि सद्धर्म यांची चांगली ओळख (अर्थात् संपूर्ण ज्ञान) झाल्यानंतरच मोक्षाच्या मार्गानें प्रयाण होऊं शकतें.**" हा हृदयांतील अज्ञान ग्रंथीचा नाश करणारा उपदेश ऐकत असतांनाच नयसार यांना सम्यक्त्वाची प्राप्ति झाली. जेव्हां कोणाही (तीर्थकारांच्या) जीवात्म्यास समकिताची प्राप्ति होतें तेव्हांपासून तो जीवात्मा मुक्त होईपर्यंतच्या त्याच्या मोठ्या जन्मांचीच गणना (मोजणी) केली जाते. श्री जैन शासनांत सम्यक्त्व प्राप्तीच्या पूर्वीचीं अनंत जन्म-मरणें तर व्यर्थ (वाया) गेलेलीं-कांहींही उपयोग किंवा किंमत यांच्या शिवायचीं सांगितलीं आहेत. ह्या नियमाप्रमाणें

अनंत काळच्या भवभ्रमणानंतर श्रीमहावीर देवांच्या जीवात्म्यास नयसाराच्या जन्मांत सम्यक्त्वाची प्राप्ति झाली, म्हणून हाच त्यांचा पहिला जन्म म्हटला गेला. त्यांनीं पंचपरमेष्ठयांच्या पवित्र ( शुभ ) ध्यानांत स्वतःचा देह सोडला.

**दुसऱ्या जन्मीं** ते सौधर्म नांवाच्या पहिल्या देवलोकांत एक पल्योपम आयुष्य असलेले देव झाले.

**तिसऱ्या जन्मीं** ते चक्रवर्ती भरत महाराजांचे पुत्र **मरीचि** होते. त्यांनीं श्रीऋषभनाथ देवांजवळून भागवती दीक्षा (जैन धर्माप्रमाणें संन्यास) घेतली; पण चांगल्या प्रकारें चारित्राचें पालन करूं न शकल्यानें थोड्याच दिवसानंतर ते त्रिदंडी ( संन्यासी ) झाले. एकदा समवसरणांत भरत महाराजांनीं श्रीऋषभनाथ देवांना विचारलें — " हे देवा ! भविष्यांत तीर्थंकर होईल असा कोणी श्रेष्ठ जीवात्मा येथें आहे कां ? " प्रभूंनीं सांगितलें — " तुझा पुत्र मरीचिच ह्याच अवसर्पिणींत शेवटचा २४ वा तीर्थंकर होईल. " हें ऐकून भरत महाराजांनीं भावी तीर्थंकर समजून स्वतःच्या पुत्रास–मरीचीस नमस्कार केला. हें सर्व एकून व पाहून मरीचीला स्वतःच्या कुलाचा मद झाला — " माझें कुल किती श्रेष्ठ ! माझे आजोबा पहिले तीर्थंकर देव, माझे वडील पहिले चक्रवर्ती राजे आणि मी स्वतः पहिला वासुदेव ! आणखी......आणि मी शेवटचा तीर्थंकर देवही होणार ! " अशा प्रकारें अभिमान–गर्व केल्यानें त्यांनीं नीच गोत्राचें कर्म बांधलें. तें कर्म भोगतां भोगतां शेवटीं जें कांहीं थोडें शिल्लक राहिलें, तें तीर्थंकराच्या जन्मांत ( सुद्धां ) ८२ दिवस देवानंदा ब्राह्मणीच्या गर्भांत राहून भोगावें लागलें.

**चौथ्या जन्मीं** ते पांचव्या देव लोकांत १० सागरोपम आयुष्य असलेले देव झाले.

**पांचव्या जन्मीं** ते कोल्लाक गांवांत कौशिक नांवाचे त्रिदंडी झाले.

**सहाव्या जन्मीं** ते स्थूणा नगरींत ७२ लाख पूर्व आयुष्य असलेले पुष्य नांवाचे ब्राह्मण झाले.

**सातव्या जन्मीं** ते सौधर्म देवालोकांत देव झाले.

**आठव्या जन्मीं** ते ६० लाख पूर्व आयुष्य असलेले अग्निदत्त नांवाचे त्रिदंडी ( संन्यासी ) झाले.

**नवव्या जन्मीं** ते ईशान देवलोकांत देव झाले.

**दहाव्या जन्मीं** ते मंदर नांवाच्या गांवांत ५६ लाख पूर्व आयुष्य असलेले अग्निभूति नांवाचे त्रिदंडी ( संन्यासी ) झाले.

**अकराव्या जन्मीं** ते सनत्कुमार नांवाच्या देवलोकांत देव झाले.

**बाराव्या जन्मीं** ते श्वेतांबी नगरींत ४४ लाख पूर्व आयुष्य असलेले त्रिदंडी ( संन्यासी ) झाले.

**तेराव्या जन्मीं** ते माहेंद्र देवलोकांत देव झाले.

**चौदाव्या जन्मीं** ते राजगृही नगरींत ३४ लाख पूर्व आयुष्य असलेले त्रिदंडी ( संन्यासी ) झाले.

**पंधराव्या जन्मीं** ते पांचव्या ब्रह्म देवलोकांत देव झाले.

**ह्या जन्मानंतर त्यांचें बरेंचसें भव-भ्रमण झालें — त्यांना अनेक लहान-लहान ( क्षुल्लक ) जन्म घ्यावे लागले.**

**सोळाव्या जन्मीं** ते विश्वभूति नांवाचे राजपुत्र होते. त्यांनीं संभूति नांवाच्या गुरु महाराजांजवळून दीक्षा घेतली. एकदा तप करत असतांना तपाबद्दल बलाची मागणी केली. अनशन व्रत ( ज्यास मराठींत प्रायोपवेशन असें ही म्हणतात. ह्यांत आमरणांत—मरेपर्यंत अन्न-पाणी सोडलें जातें. ) केलें, पण निदान ( नियाण ) करून तें तप विकलें. ह्याचें फळ म्हणून ते १८ व्या जन्मीं त्रिपृष्ट वासुदेव झाले.

**सतराव्या जन्मीं** ते महाशुक्र देवलोकांत देव झाले.

**अठराव्या जन्मीं** ते पोतनपुरींत ८४ लाख पूर्व आयुष्य असलेले **त्रिपृष्ट वासुदेव** होते. ह्या जन्मांत त्यांनीं स्वतःच्या एका संगीतप्रिय ( गाण्याची आवड असलेल्या ) नोकराच्या कांहीं एका अगदीं सामान्य ( किरकोळ ) चुकीबद्दल दुसऱ्या नोकराकडून त्याच्या कानांत अगदीं ऊन

पू. ५९८ च्या **चैत्र शु. १३** आणि **मंगळवारच्या मंगल पहाटेस** अगदीं सर्वोत्तम सुमुहूर्तावर **क्षत्रियकुंड नगरचे** महाराजाधिराज **श्री-सिद्धार्थ** यांची अत्यंत पवित्र (व धार्मिक अशी) आदर्श धर्मपत्नी-महाराणी **त्रिशलादेवी** हिला एक अत्यंत अनुपम व तेजस्वी असें पुत्ररत्न झालें. स्वतःच्या पोटीं देव जन्म घेणार आहेत, हें राणीस पूर्वीच १४ गूढ (गुप्त) अर्थसूचक स्वप्नांमुळें समजलें होतें. प्रभूंचा जन्म होतांच सर्वत्र–नरकांत सुद्धां (ज्ञान) प्रकाशच (ज्ञान) प्रकाश झाला. ५६ दिक्कुमारिका देव-सेवेच्या अमूल्य (व अपूर्व) संधीचा लाभ घेण्यासाठीं हजर झाल्या. देवराज श्रीसौधर्मेन्द्रांचें सिंहासन कंपायमान होतांच ते सुद्धां आपल्या परिवारासह प्रभूंच्या अपूर्व सेवा–भक्तीच्या संधीचा लाभ घेण्यासाठीं तेथें उपस्थित झाले. माता व प्रभु यांना सविनय नमस्कार करून, मातेजवळ प्रभूंचें प्रतिबिंब (छायरूप) ठेऊन आणि मातेची आज्ञा घेऊन सर्व देवतागण स्नात्र महोत्सव साजरा करण्यासाठीं प्रभूंना घेऊन मेरू पर्वतावर गेले. तेथें सर्व देवांनीं मिळून प्रभूंना अनेक तीर्थांच्या जलानें अभिषेक (स्नान) घातलें व ते त्यांना मातेजवळ ठेऊन आले. नंतर सर्व देव–देवींनीं नंदी-श्वरद्वीपांत प्रभूंचा जन्मोत्सव मोठया आनंदानें उजविला व ते आप-आपल्या स्थानीं निघून गेले. सिद्धार्थ महाराजांनींसुद्धां पुत्रजन्म–महोत्सव इतक्या आनंद–उत्साहानें व थाटामाटानें उजविला कीं पृथ्वीवर जणूं कांहीं एक लहानसें स्वर्गच उतरलें आहे, असें सर्वांना वाटूं लागलें. राजपुत्राचा जन्मोत्सव इतका तर अप्रतीम झाला कीं संपूर्ण शहरांत आनंद-उत्साहाच्या ऊर्मि उसळूं लागल्या. राजानें याचक, भाट, चारण वगैरे लोकांना अगदीं मोकळ्या हातानें दान देऊन दारिद्र्यास आपला गाशा गुंडाळावयास लावलें.

प्रभूंचें नांव **श्रीवर्द्धमानकुमार** ठेवण्यांत आलें. आत्मगुणांच्या स्वयं-प्रतापी तेजानें (दराऱ्यानें) व सामर्थ्यानें (ऐश्वर्यानें) यथार्थ असें आणि इंद्रानें ठेवलेलें '**महावीर**' हें उपनाम (दुसरें नांव) लोकांच्या तोंडांतून एकाएकीं निघून गेलें.

श्रीवर्द्धमानकुमार दुसऱ्या राजकुमारांबरोबर अनेक वेळां गांवाच्या सीमेवरील पटांगणावर खेळण्यास जात असत. ऐके दिवशीं कोणी एका देवानें प्रभूंच्या बळाची ( शक्तीची ) परीक्षा घेण्यासाठीं एका अत्यंत भयंकर सापाचें रूप धारण केलें व तो प्रभूंना घाबरविण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यावेळीं जरा सुद्धां भ्याल्याशिवाय श्रीवर्द्धमानकुमारांनीं त्या सापास उचलून भिरकावून दिलें. ह्यामुळें प्रभूंचें नांव " महावीर " पडलें. पुनः खेळ सुरू झाला. ते सर्व मिळून आमलकी नांवाचा खेळ ( वाह्य-वाहक लीला ) खेळत होते. त्यांत हा ( परीक्षा घेण्यासाठीं आलेला ) देव सुद्धां राजकुमाराच्या वेशांत होताच. त्या देवानें प्रभूंना आपल्या खांद्यावर बसविलें व महिमा सिद्धीच्या प्रभावानें तो स्वतःचें स्वरूप वाढवूं लागला. हें पाहतांच प्रभूंनीं त्याच्या मानेवर असा कांहीं जोरानें बुक्का मारला कीं लागलीच त्या देवानें स्वतःचें खरें रूप प्रगट केलें आणि सर्व राजकुमारांसमक्ष देखील प्रभूंजवळ स्वतःच्या चुकीबद्दल अगदीं नम्रतेनें क्षमा मागितली.

अभ्यास करण्यासारखें वय होतांच सिद्धार्थ महाराजांनीं शुभ दिवशीं नि शुभ मुहूर्तावर आपल्या वर्द्धमानकुमारास मोठ्या थाटामाटानें अभ्यासा-साठीं शाळेंत दाखल केलें. शिक्षकांना उत्तम उत्तम वस्तु भेट देऊन त्यांचा सत्कार करण्यांत आला व शाळेंतील मुलांना ( विद्यार्थ्यांना ) सुद्धां चांगलीं चांगलीं बक्षिसें आणि मिठाई ( गोड पदार्थ – पेढे, बर्फी वगैरे ) देऊन प्रसन्न-प्रसन्न केलें. शिक्षकांना वर्द्धमानकुमारास शिकविण्याची फार हौस होती; पण सर्वज्ञ अशा देवास शिकविण्याचें तें काय असूं शक-णार ? शिक्षकांनीं प्रभूंना शिकवावें — ही ज्ञानी देवांची विटंबना ( किंवा अवहेलना ) होऊं नये म्हणून स्वर्गपति इंद्र ब्राह्मणाचा वेश घेऊन तेथें आले आणि त्यांनीं चर्चा ( प्रश्नोत्तरांत प्रभूंजवळून स्वतःच्या शंकांचीं समाधानें ) करून जणूं कांहीं शिक्षकांच्या शंका दूर केल्या. ह्याच वेळीं प्रभूंनीं " जैनेंद्र " व्याकरण रचलें.

कर्माच्या अचल ( न बदलणाऱ्या, दृढ ) व दुर्ज्ञेय ( अगम्य ) सत्तेतून कोण मुक्त राहिलें आहे ? प्रभूंच्या भोगावलि कर्माच्या उदयाची वेळ जवळच आली असल्यामुळें एके दिवशीं आई-वडलांच्या फारच आग्रहामुळें **यशोदा** नांवाच्या एका सुरूप व सुलक्षणी राजकुमारिकेशीं प्रभूंचें पाणिग्रहण-लग्न झालें. " सर्व विरतीचा अंगीकार केल्याशिवाय मोक्षप्राप्ति होऊंच शकणार नाहीं "—ही गोष्ट विरागी प्रभु उत्तम प्रकारें जाणत होते; म्हणूनच लग्न झालें तरीसुद्धां प्रभु संसाराच्या विषयकषायवर्धक रंगरागांत-विलासांत गर्क न होतां निर्लेपप्रायच राहिले. त्यांना एक मुलगी झाली, तिचें नांव ठेवलें होतें **प्रियदर्शना.**

२८ व्या वर्षी प्रभूंना आई-वडलांचा वियोग झाला. संपूर्णच्या संपूर्ण शहर जणूं कांहीं शोकसागरांत बुडालें होतें. प्रभूंनीं स्वतःचे ज्येष्ठबंधु **श्रीनंदिवर्द्धन** महाराज यांना शरीराची क्षणभंगुरता – नश्वरता आणि आत्म्याची अमरता – नित्यता समजावून सांगितली आणि त्याचें आई-वडलांच्या वियोगाचें दुःख हलकें केलें. आई-वडलांचें स्वतःवरील गाढ ( अपरंपार-नितांत ) प्रेम पाहून प्रभूंनीं गर्भांत असतानांच असा अभिग्रह घेतला ( निश्चय केला ) कीं – ' आई-वडील जिवंत असेपर्यंत मी दीक्षा घेणार नाहीं. ' आतां स्वतःचा अभिग्रह पूर्ण झाला आहे व वडील बंधूंचें दुःख सुद्धां हलकें झालें आहे, असें पाहून प्रभूंनीं नंदिवर्द्धन महाराजांजवळ ( आपल्या मोठया भावाजवळ ) चारित्र ( दीक्षा ) घेण्याची आज्ञा मागितली. ज्येष्ठबंधूंनीं प्रभूंना पुष्कळ समजाविलें तेव्हां त्यांनीं दोन वर्षे रहाण्याचे कबूल केलें व शेवटच्या वर्षांत ( वर्षभर ) अगदीं मुक्तहस्तानें दान दिलें, जणूं कांहीं दानाचे झरेच वाहविले. ह्या दानास ' **वार्षिकदान** ' असें म्हणतात.

श्रीवर्द्धमानकुमार संसाराचा त्याग करून आतां दीक्षा घेणार म्हणून नंदिवर्द्धन महाराजांनीं हा दीक्षा-महोत्सव मोठया धामधुमीनें-थाटामाटानें आणि आनंद-उत्साहानें साजरा केला. देव-देवेंद्रांनींसुद्धां ह्या उत्सवांत

❋ प्रभूंच्या फक्त एका बोटास देखील असंख्य देव-देवेंद्र मिळून सुद्धां वाकवूं शकले नाहींत ? प्रभूंचें हें केवढें ( अमर्याद-अनंत ) बळ ! [ व्यायाम करून ह्या शरीराच्या कितव्या हिश्श्याची शक्ति येत असेल ? खरी शक्ति ( खरें बळ ) तर पुण्याच्याच आधीन असूं शकते. कृत्रिम ( बळेंच मिळविलेलें ) बळ तर अधिकांशीं पाशविकच असणार. ]

❋ श्रीतीर्थंकर देवांच्या पुण्याची ही सीमा नव्हती. त्यांच्या चरणारविंदांच्या पवित्र ( आदर्श ) सेवेंत असंख्य देव-देवेंद्र सदैव हजर असत. ते प्रभूंना उघड्या जमिनीवर पाय देखील ठेवूं देत नसत, लागलीच ते प्रभूंच्या पायाखालीं नऊ सोनेरी ( सुवर्ण ) कमळें ठेवीत असत. तरी देखील प्रभूंना गर्व किंवा ताठा हा मुळीच नव्हता. [ मासिक सवाशेचा पगार किंवा (वार्षिक) पांच हजाराची प्राप्ति होऊं लागली, म्हणजे सायकल किंवा मोटारीशिवाय कोठेंही जाण्यांत आपल्या प्रतिष्ठेत कमीपणा येतो, असें मानून आपण जो आपल्या पुण्याचा अभिमान करतो, तो योग्य आहे कां ? ]

❋ त्या प्रतापी महापुरुषाचा प्रभाव देखील अद्‌भुत होता. ते जेथें जेथें जात, तेथें तेथें ५०० कोसापर्यंत ( अर्थात् सुमारें एक हजार मैलांच्या टापूंत ) दुष्काळ, भय, रोग वगैरे संकटें औषधालासुद्धां मिळत नसत ! आणि हा प्रभाव कोणत्या तरी एकाच दिशेस दिसणारा नसून चारही दिशा, चारही उपदिशा व ऊर्ध्व नि अधोदिशांत — सर्वत्र दिसतो ! वा ! केवढें दिव्य ऐश्वर्य ! [ आपण १०-२५ जण जर एकाद्या आजारी माणसाजवळ गेलो, तर त्याचें दुखणें ( गलका करून ) वाढवूं कीं हलकें करूं ? ]

❋ त्या दिव्य विभूतीस भूत, भविष्य नि वर्तमान, ह्या तिन्ही काळांचें आश्चर्यजनक ( हस्तभूत - साठ्यान् सदा ) ज्ञान होतें. [ काल खाल्लेलें सुद्धां आज आपल्या लक्षांत कोठें राहतें ? अगदीं तोंडपाठ केलेलें सुद्धां आपण कोठें विसरून जात नाहीं ? भिंतीच्या पलीकडे काय होत आहे, हें सुद्धां आपणांस कळत नसतें. तरी देखील " आम्ही शिकलेले सवरलेले आणि सुधारलेले ( किंवा मोठे )

विद्वान् ( पंडित ) आहोत " असा केवढा मोठा ताठा
( उगाचच ) ठेवतो ! वीतरागीपणाच्या मार्गापासून
किती दूरवर आहोत; आपली परिस्थिति किती विपरीत

❋ ते प्रभु जेव्हां विहार करीत असत, तेव्हां रस्त्यांतील कांटे उल
असत ! [ आपण तर जरी खाली पाहून चाललो तरीही
लागतातच; आणि जर वरच पाहून चालूं लागलो तर म
विचारता : ठेच ही अवश्य लागावयाची, उलटे असलेले
सुलट होऊन वोचावयाचे नि आपण खड्डयांत जाऊन प
हें खचितच ! आपल्या सदऱ्याला एकाद्या अत्तराचा वा
असेल, पण आपल्यांत एखाद्या सद्गुणाचा सुगंध मिळणें
जवळ अशक्यच आहे. ]

❋ त्या महान् पुण्यश्लोक प्रभूंच्या देशनेचा अपूर्व चमत्कार असा होता
देशना सर्व लोक ( प्रत्येक जण ) — देव, मनुष्य, तिर्यंच इत्यादि
कन् आपआपल्या भाषेंत समजत होते. प्रभु मागधी भाषेंत
रागांत देशना देत आणि पोपट व वाघ किंवा मद्रासी व बंगाली
आपल्या भाषेंत समजत, ही तर एक अत्यंत आश्चर्याचीच गो
[ आज ह्या पृथ्वीवर बारा भाषा येणारा भाषाशास्त्री मिळूं
परंतु एका भाषेंत व्याख्यान होत असून तें वेगवेगळ्या
लोकांना समजतें, असें कोठेंही पाहाण्यांत किंवा
देखील नाहीं. ]

❋ त्या महापुरुषाच्या देशनेचा प्रभावच असा होता कीं, ती देशना
कोणासही भूक, तहान, थकवा, झोप इत्यादि शारीरिक गरजा
नसत, अर्थात् सर्व देशना ऐकण्यांत कमालीचे गर्क होत. [
श्रोता दोघेही आळशी, स्वार्थी आणि चारित्र्याच्या
उणीव असलेले; मग दोघे एकरस होणार तरी कसे
संपूर्ण परोपकारी नि श्रोता खरा जिज्ञासु असेल, तर
संयोग जमतो. ]

❋ सम्यक्त्व मिळाल्यानंतर २७ व्या जन्मीं ते महावैभवशाली प्रभु
मिळवून निर्वाणपद प्राप्त करूं शकले. [ तर मग आपले अजू

जन्म बाकी आहेत, हें तर महाज्ञानी नि महाश्रुतधर यांनाच ठाऊक! सम्यक्त्वाच्या ६७ लक्षणांपैकीं एक देखील लक्षण आपल्यांत यथासांग दिसत नाहीं. अर्थात् समकिताचाच कांहीं थांग-पत्ता नाहीं; तर मग केवळज्ञान नि मोक्षाची गोष्टच कशाला (कोठून)?]

प्रभु श्रीमहावीर देवांनीं (राजपुत्र नंदनाच्या २५ व्या जन्मीं) तीर्थंकर नामकर्माचें उपार्जन केल्यावर (नंतरच्या जन्मांत) त्रिदंडी (संन्यासी) वगैरे वेष धारण केले नाहींत. परंतु नयसाराच्या जन्मांत सम्यक्त्व प्राप्त झाल्यावर त्यांनीं कधीं मिथ्या प्ररूपणाही केली आहे, कधीं त्रिदंडी (संन्यासी) साधूचा वेषही धारण केला आहे, तर कधीं चारित्राचें आराधन (पालन) देखील केलें आहे. ह्या कारणामुळें तीर्थंकरांच्या विरुद्ध बडबड करणारे, त्रिदंडी वगैरे वेषांत राहाणारे, भगवे कपडे घालणारे वगैरे जे दुसरे अनेक लोक ह्या जगांत फिरतात, त्यांत भविष्यांत श्रीतीर्थंकर देव होणारा पवित्र जीवात्मा नसेलच, असें आपण म्हणूं शकत नाहीं. आणि म्हणूनच इतर धर्माच्या कोणाही साधूचा किंवा अनुयायी मनुष्याचा तिरस्कार करूं नये व त्यांस त्रास देखील देऊं नये. इतर धर्माच्या लोकांस देखील आपण खमविलें (त्यांना क्षमा करणें व त्यांच्या जवळ क्षमा मागणें—हें केलें) पाहिजे. आणि ह्या कारणामुळेंच पृथ्वीकायापासून पंचेंद्रियापर्यंतच्या सर्व जीवांना आपण वारंवार–पुनः पुनः खमविलें पाहिजे. [अहिंसा धर्माचीं मुळें किती (पाताळापर्यंत) खोल गेलेलीं आहेत आणि सर्व जीवात्म्यांना खमविण्यांत केवढें गूढ रहस्य समविलेलें आहे — ह्या गोष्टींचें चिंतन-मनन आपण रोज किती वेळ करतो?]

भरत महाराजांना श्रीऋषभनाथ देवांजवळून समजलें कीं, त्रिदंडी संन्याशाच्या वेषांत असलेला माझा मुलगा मरीचि पुढें जातां (भविष्यांत) श्रीतीर्थंकर देव होणार आहे. तेव्हां भरत महाराजांनीं मरीचीजवळ जाऊन त्याचा किंवा त्याच्या वेषाचा अपमान केला नाहीं. (उलटपक्षीं त्यास नमस्कार केला.) भरत महाराजांचें हें केवढें मोठें गांभीर्य! [दुसऱ्यास अकार्य (अयोग्य काम) करतांना पाहून आपण कधीं

[ उत्तम गति प्राप्त होण्यासाठीं शेवटची वेळ देखील शांतिमयच असावयास पाहिजे — असें समजून आपण समाधीकरितां रोज किती प्रयत्न करतो ? ]

✻ उत्सूत्र-प्ररूपणा करणाऱ्यांना देखील तिरस्कार करूं नये. ह्यांतील कारण असें आहे कीं, प्रभूंच्या जीवात्म्यानें सुद्धां मरीचीच्या जन्मांत उत्सूत्र-प्ररूपणा केली, मनःपूत त्रिदंडी साधूचा वेष धारण केला व स्वतःचें संसार-चक्रांतील भ्रमण वाढविलें. ह्या कारणामुळेंच इतर धर्मांत-संप्रदायांत भविष्यांत होणारे एखादे श्रीतीर्थंकर देव नसतीलच, असें आपण म्हणूं शकत नाहीं. जिनवचनाविरुद्ध आचरण करणाऱ्यांचा तिरस्कार करण्यांत एखाद्या श्रीतीर्थंकराच्या आत्म्याचा अपमान झाल्यानें आशातना ( अनादर व त्यामुळें पाप ) होणार नाहीं का ? [ आपण तर अभिमानांतल्या अभिमानांत रोज अनेक वेळां अनेकांची अवहेलना करत असूं ! ]

✻ जे पुढें जातां समवसरणांत बसून सर्व विश्वास मोक्षाच्या नि विश्वबंधुत्वाच्या वास्तविक उपदेशाचा धडा शिकविणार होते आणि ज्यांना जन्मतःच निर्मल असें अवधिज्ञान होतें, अशा प्रभूंना शिकविण्यासाठीं शाळेंत दाखल करण्याचें नक्की करण्यांत आलें. प्रभूंना थाटामाटानें मिरवत मिरवत शाळेंत शिक्षकाजवळ नेलें. पण शेवटपर्यंत प्रभु तर गंभीरच राहिले. " मी ज्ञानी आहे नि तुम्ही सर्व हें काय करतां ? ' असें त्यांनीं विचारलें-सांगितलें देखील नाहीं ! प्रभूंचें हें केवढें अगाध गांभीर्य ! [ आपल्यांत असें गांभीर्य केव्हां येईल ? ]

## (१२) प्रश्नोत्तरें

प्रश्न १ — श्रीमहावीर देवांच्या आत्म्यास कोणत्या जन्मीं नि कशा परिस्थितींत सम्यक्त्वाची प्राप्ति झाली ?

उत्तर — नयसाराच्या ( पहिल्या ) जन्मीं श्रीमहावीर देवांनीं अरण्यांत वाट चुकलेल्या एका मुनिराजांना गोचरीचें ( मधुकरीचें ) दान देण्याची संधि साधून पुण्य प्राप्त केलें. साधुमहाराजांना सुख झालें, हें पाहून नयसार मनांत आनंदित झाले व मुनिराजांना बरोबर असलेल्या रस्ता दाखविण्या-

साठीं त्यांच्या बरोबर निघाले. अर्हंत साधु महाराजांनीं नयसारास उपदेश दिला – "हे सुदैवी जीवा ! तूं तर हा द्रव्यमार्ग दाखविलास; पण खरा तर भावमार्गच असून त्या मार्गानें गेलें पाहिजे. सुदेव, सुगुरु आणि सद्धर्मांची खरीखुरी ओळख होणें, हाच भावमार्ग आहे." हा उपदेश ऐकून नयसारा (–च्या जन्मांत श्रीमहावीर देवांच्या आत्म्या–)–स सम्यक्त्वाची प्राप्ति झाली.

प्रश्न २— श्रीमहावीरस्वामी देवांनीं नीचगोत्राच्या कर्माचा बंध कोणत्या जन्मीं नि का केला ?

उत्तर — देव मरीचीच्या (तिसऱ्या) जन्मीं त्रिदंडी (संन्यासी) असतांना भरत महाराजांनीं त्यांना भविष्यांतील श्रीतीर्थंकर देव समजून नमस्कार केला. हें पाहतां क्षणींच देवांनीं मरीचीच्या जन्मीं स्वतःच्या कुळाचा फार अहंकार – अभिमान केला आणि ते नाचूं देखील लागले ! अशा प्रकारें कुळमद केल्यामुळें देवांनीं (मरीचीच्या जन्मीं) नीचगोत्राच्या कर्माचा बंध केला.

प्रश्न ३ — श्रीमहावीरस्वामींचें संसार चक्रांतील भ्रमण कोणत्या कारणानें वाढलें ?

उत्तर — मरीचीच्या (तिसऱ्या) जन्मीं (त्रिदंडी–संन्यासी असतांना) कपिल नांवाच्या कोणी एका कुळपुत्रानें देवांना धर्माच्या बाबतींत कांहीं प्रश्न केला. त्यावेळीं त्यांनीं उत्तर दिलें – "श्रीऋषभदेवांच्या साधूं-जवळ धर्म आहे, तर माझ्याजवळ देखील धर्म आहे ...... इत्यादि." अशा प्रकारें *उत्सूत्रप्ररूपणा केल्यानें त्यांनीं आपलें संसारचक्रांतील भ्रमण वाढवून घेतलें.

प्रश्न ४ — श्रीमहावीर देवांनीं २७ जन्मांत कोण–कोणत्या मोठ्या ऋद्धि (पदव्या) मिळविल्या ?

* श्रीसर्वज्ञ-केवळज्ञानी देवांनीं सांगितलेल्या सिद्धांतविरुद्ध बटबट करणें म्हणजेच 'उत्सूत्रप्ररूपणा' असून हें एक महापाप आहे.

**उत्तर** — प्रभु ( १ ) १८ व्या जन्मीं **त्रिपृष्ठ** नांवाचे 'वासुदेव' ( २ ) २३ व्या जन्मीं महाविदेहांत **प्रियमित्र** नांवाचे 'चक्रवर्ती' आणि ( ३ ) २७ व्या जन्मीं तर साक्षात् **महावीरस्वामी** 'तीर्थंकर देव' झाले— त्यांनीं ह्या तीन ऋद्धि मिळविल्या.

**प्रश्न ५** — श्रीमहावीर देवांनीं नंदन मुनीच्या जन्मांत किती तप केलें? आणि त्यापासून त्यांना काय फायदा झाला?

**उत्तर** — देवांनीं नंदन मुनीच्या २५ व्या जन्मीं ( ह्या जन्मीं प्रभु राजपुत्र असून नंतर ते मुनिराज झाले होते. ) २५ लाख वर्षांच्या आयुष्यांत १ लाख वर्षे चारित्राचें पालन करून ११ लाख ८० हजार ६४५ मासखमणें ( अर्थात् मासक्षमणें ) करीत असतांनाच श्रीवीस-स्थानक पदांचेंही आराधन केलें. ह्या तपानें देवांनीं तीर्थंकर नामकर्माचें उपार्जन केलें.

**प्रश्न ६** — श्रीमहावीरस्वामी आधीं ब्राह्मणकुळांत का आले? ८२ दिवसांनंतर देवानें त्यांना क्षत्रियकुलांत का फिरविलें?

**उत्तर** — प्रभूंनीं मरीचीच्या ( तिसऱ्या ) जन्मीं जो नीचगोत्राच्या कर्माचा बंध केला होता त्याचा भोग ८२ दिवस चालेल इतकाच शिल्लक राहिला असल्यामुळें प्रभु ८२ दिवस ब्राह्मणकुळांत राहिल्यानें तो कर्मभोग संपला. लगेच ८३ व्या दिवशीं शक्रेंद्रांचें आसन कंपित झालें व त्यांनीं स्वतःचें कर्तव्य समजून प्रभूंना ( आपल्या एका ) देवाकडून क्षत्रियकुळांत श्रीसिद्धार्थ महाराज यांच्या घरीं ( महाराणी त्रिशलादेवींच्या गर्भांत ) अदलाबदल करवून नेलें.

**प्रश्न ७** — श्रीवीर प्रभूंनीं गर्भांत कोणता अभिग्रह घेतला होता? आपण तसा अभिग्रह घेऊं शकतो कां?

**उत्तर** — आई-वडिलांचें स्वतःवरील प्रेम पाहून ( आईला फार कष्ट होऊं नयेत म्हणून ) प्रभूंनीं गर्भांत असतांना हालचाल बंद केली; परंतु ह्यामुळें मातेस अत्यंत दुःख झालें. प्रभूंनीं आपल्या ज्ञानप्रभावानें हें

जगेल आणि आईचें आपल्यावरील निस्सीम प्रेम पाहून गर्भांत असतां-नाच अभिग्रह घेतला — 'आई-वडील असेपर्यंत मी दीक्षा घेणार नाहीं.'

आतां ( जन्मल्यानंतर ) आपण असा अभिग्रह घेऊं शकत नाहीं. कारणें — ( १ ) प्रभूंना अवधिज्ञान होतें, आपणास तसें ज्ञान नाहीं. ( २ ) देवांचें आयुष्य तोंपर्यंत संपणार नव्हतें, आपल्या आयुष्याचें कांहीं निश्चित आहे कां ! ( ३ ) देवांनीं हा अभिग्रह जन्म होण्यापूर्वीं ( गर्भांत असतांनाच ) घेतला, जन्मानंतर नाहीं; आणि आपण तर जन्मानंतर अभिग्रह घेण्याच्या गोष्टी करतो.

खरी गोष्ट अशी आहे कीं, जन्मानंतर ( अभिग्रह घेण्यास योग्य ) अशी ( अनुकूल ) परिस्थिति मिळणेंच मुळीं कठिण. ' आम्ही सुद्धां देवां-सारखा अभिग्रह घेऊं शकतो, ' असें म्हणणाऱ्यांनीं तर आई-वडिलांच्या ( देहावसाना )नंतर लागलीच दीक्षा घेतली पाहिजे—असा अगदीं स्पष्ट भाव निघेल. परंतु खरी वस्तुस्थिति अशी असते कीं, आई-वडिलांनंतर तर सर्व भार बहुधा आपल्याच डोक्यावर येतो आणि मग तर दीक्षा घेण्यांत अनेक विघ्न-संकटें येतात.

या सर्व कारणांमुळें आपण प्रभूंसारखा अभिग्रह घेऊ शकत नाहीं.

प्रभूंच्या अभिग्रहांत आई-वडिलांवरील अतिशय प्रेम आणि दृढ भक्ति-भाव या गोष्टीच मुख्य होत; म्हणून आपण सुद्धां प्रभूंच्या या अभिग्रहां-वरून आई-वडिलांच्या सेवा-भक्तीचा ( अर्थात् त्यांच्या आज्ञेंत राहण्याचा ) धडा घेतला पाहिजे.

प्रश्न ८ — प्रभूंचें ' महावीर ' हें नांव कोणी ठेवलें ?

उत्तर — प्रभु आमलकी ( नांवाचा ) खेळ खेळत होते, तेव्हां कोणी एक देव त्यांची परीक्षा घेण्यासाठीं तेथें आले; परंतु ते स्वतःच अगदीं पूर्णपणें हरले. यामुळें त्या देवांनींच प्रभूंचें ' महावीर ' असें नांव ठेवलें. आई-वडिलांचें ठेवलेलें नांव तर ' वर्द्धमानकुमार ' होतें.

प्रश्न ९ — ' जैनेंद्र ' व्याकरणाची रचना केव्हां झाली ?

उत्तर -- आई-वडिलांच्या स्नेहाच्या भावनेमुळें प्रभु शिकण्यासाठीं शाळेंत गेले. इंद्रमहाराजांना ही गोष्ट समजली नि ते लागलीच ब्राह्मणाच्या रूपांत तेथें हजर झाले. शाळेंत शिकविणाऱ्या शिक्षकांना ज्या गोष्टी अडत होत्या ( येत नव्हत्या ), त्या बाबतींतच त्या ब्राह्मणानें (अर्थात् इंद्रांनीं ) प्रभूंना कांहीं प्रश्न विचारले. प्रभूंनीं त्या प्रश्नांचीं उत्तरें अगदीं बरोबर पटवून-समजावून दिलीं. जणूं कांहीं त्या शिक्षकांच्या शंकांचें निरसनच केलें. हीं सर्व उत्तरें ऐकून शिक्षकांनीं प्रभूंना नमस्कार केला. नंतर त्या ब्राह्मणानें सांगितलें -- "मी इंद्र असून हे तर साक्षात् महाज्ञानी प्रभूच आहेत. ह्यांना शिकण्याची गरज मुळीं नाहींच, हे तर स्वयंबुद्ध आहेत." हें सर्व पाहून नि ऐकून सर्व लोक आश्चर्यचकित झाले. ह्याच वेळेस प्रभूंनीं "जैनेंद्र व्याकरणा"ची रचना केली.



# (?) मुख्य तीर्थस्थानांची संक्षिप्त माहिती

## (अ) गुजराथ

| क्रमांक | तीर्थस्थळ | तीर्थंकर देव | जवळचें स्टेशन | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| [ १ ] | श्रीशंखेश्वर | पार्श्वनाथ | विरमगांव | ह्या चोविशींतील अद्वितीय चमत्कारपूर्ण देव. राधनपुर ३४ मैल. |
| [ २ ] | भोयणी | मल्लिनाथ | भोयणी | घेलडा स्टेशन २ मैल. |
| [ ३ ] | मातर | सुमतिनाथ | महेमदाबाद | खेडा ४ मैल. नडियाद १४ मैल. |
| [ ४ ] | पानसर | महावीरस्वामी | पानसर | गांवांत देरासर जिनमंदिर आहे. |

| क्रमांक | तीर्थस्थळ | तीर्थंकर देव | जवळचें स्टेशन | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|

## ( इ ) बिहार

| क्रमांक | तीर्थस्थळ | तीर्थंकर देव | जवळचें स्टेशन | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| [ १८ ] | सिंहपुरी | श्रेयांसनाथ | सारनाथ | चार कल्याणकें. काशी ६ मैल ( मोटार ). |
| [ १९ ] | चंद्रपुरी | चंद्रप्रभु व शांतिनाथ | ,, | चार कल्याणकें. काशी १४ मैल. ( मोटार ). |
| [ २० ] | अयोध्या | आदिनाथ | अयोध्या | सोळा कल्याणकें. कटरा महल्ला ( पेठ ). फैजाबाद ४ मैल. |
| [ २१ ] | अष्टापद | त्या चोविशी-तील सर्व प्रभु | (विच्छेदतीर्थ) | आदिनाथ निर्वाण. उत्तर हिमालय, कैलास इत्यादि. |
| [ २२ ] | बिहार-शरीफ | आदिनाथ | बिहार-शरीफ | तुंगिया नगरी. श्रावक धर्मशाळा ( सराय ). |
| [ २३ ] | शौरीपुर | नेमिनाथ | शिकोहा | च्यवन-जन्म कल्याणकें. |
| [ २४ ] | क्षत्रियकुंड | महावीरस्वामी | लखीसराई-जमुई | पर्वत. जन्म – दीक्षा कल्याणकें. सिकंदराबाद ३ मैल. |
| [ २५ ] | हस्तिनापुर | १६-१७-१८ | मीरत | बारा कल्याणकें. मुवानाहून मोटार. |
| [ २६ ] | ऋजुवालिका | महावीरस्वामी | गिरिडी | केवळज्ञान कल्याणक. समेतशिखर ८ मैल. मध्यें बाकर नदी. |
| [ २७ ] | श्रीसमेतशिखर | पार्श्वनाथ | गिरिडी–पारसनाथ | वीस प्रभूंचें मुक्तिधाम–मधुवन. कलकत्ता २१५ मैल. |
| [ २८ ] | चंपापुरी | वासुपूज्य-स्वामी | भागलपुर जंक्शन | चार कल्याणकें. भागलपुर २ मैल. धर्मनाथ मंदिर. |
| [ २९ ] | पावापुरी | महावीरस्वामी | बिहार-शरीफ | प्रभूंचें पहिलें व शेवटलें समवसरण आणि निर्वाण ( मोक्ष कल्याणक ). ४४०० जणांना दीक्षा. |

| क्रमांक | तीर्थस्थळ | तीर्थंकर देव | जवळचे स्टेशन | विशेष माहिती |
|---|---|---|---|---|
| [ ३० ] | कुंडलपुर | गौतमस्वामी | नालंदा | गौतमस्वामींचें जन्मस्थान विहार ७ मैल (वडगांव). |
| [ ३१ ] | राजगृही | मुनिसुव्रत-स्वामी | राजगीर | पांच डोंगर. चार कल्याणकें. लहान रेल्वे ( मोटार ). |
| [ ३२ ] | गुणाया | महावीरस्वामी | नवादा | जलमंदिर. गुणशील चैत्य. नवदा १½ मैल. |
| [ ३३ ] | काकंदी | सुविधिनाथ | लखीसराई-जमुई | चार कल्याणकें (मोटार). |

## ( ई ) राजस्थान-मध्यभारत

| | | | | |
|---|---|---|---|---|
| [ ३४ ] | धुलेवा ( केशरिया ) | आदिनाथ | उदयपुर | केशरिया. उदयपुर ४० मैल. उदयपुरांत अंदाजें ३५ मंदिरें आहेत. |
| [ ३५ ] | नांदिया | जीवितस्वामी | सज्जन रोड | वामणवाड ४ मैल. शिरोही १४ मैल. |
| [ ३६ ] | साचोर | महावीरस्वामी | डीसा | घानेरा ३४ मैल. भीलडिया ६० मैल. |
| [ ३७ ] | मांडवगड | सुपार्श्वनाथ | मऊ | शांतिनाथ ( पर्वत ). |
| [ ३८ ] | राणकपुर | आदिनाथ | फालना | तीन मंदिरें. त्रैलोक्य-दीपक. राणी स्टेशन ११ मैल. माघ–फाल्गुन व० १० आणि आश्विन शु० १३ स जत्रा भरते. |
| [ ३९ ] | जिरावला | पार्श्वनाथ | डीसा | आबु १८ मैल. भाद्रपद शु० ४–६ स जत्रा. |
| [ ४० ] | जेसलमेर | ,, | बाडमेर | प्राचीन ग्रंथ भांडार. ( मोटार ). |
| [ ४१ ] | लोद्रवा | ,, | ,, | जेसलमेर १७ मैल. |

| क्रमांक | तीर्थंकर देव | लंछन | क्रमांक | तीर्थंकर देव | लंछन |
|---|---|---|---|---|---|
| १३ | श्रीविमलनाथ | डुकर | १९ | श्रीमल्लिनाथ | घडा |
| १४ | श्रीअनंतनाथ | ससाणा | २० | श्रीमुनिसुव्रतस्वामी | कासव |
| १५ | श्रीधर्मनाथ | वज्र | २१ | श्रीनमिनाथ | निळें कमळ |
| १६ | श्रीशांतिनाथ | हरण | २२ | श्रीनेमनाथ | शंख |
| १७ | श्रीकुंथुनाथ | बोकड | २३ | श्रीपार्श्वनाथ | साप |
| १८ | श्रीअरनाथ | नंदावर्त (स्वस्तिक) | २४ | श्रीमहावीरस्वामी | सिंह |

प. पू. आचार्य श्रीलक्ष्मीरतनसूरि महाराजांचें गुजराथी भाषेंतील खालील चैत्यवंदन वाचा. त्यांत चोवीसही श्रीतीर्थंकर देवांचीं लंछनें आहेत.

वृषभ लंछन ऋषभदेव, अजित लंछन **हाथी** ।
संभव लंछन **घोडलो,** शिवपुरनो साथी ॥ १ ॥
अभिनंदन लंछन **कपि, क्रौंच** लंछन सुमति ।
**पद्म** लंछन पद्म प्रभु, विश्वदेव सुमति ॥ २ ॥
सुपार्श्व लंछन **साथीओ,** चंद्रप्रभु लंछन **चंद्र** ।
**मगर** लंछन सुविधिप्रभु, **श्रीवच्छ** शीतल जिणंद ॥ ३ ॥
लंछन **खड्गी** श्रेयांसने, वासुपूज्यने **महिष** ।
**सूअर** लंछन विमळदेव, भविया ते नमो शीष ॥ ४ ॥
**सींचाणो** जिण अनंतने, **वज्र** लंछन श्रीधर्म ।
शांति लंछन **मृगलो,** राखे धर्मनो मर्म ॥ ५ ॥
कुंथुनाथ जिन **बोकडो,** अरजिन **नंदावर्त** ।
मल्लि **कुंभ** वखाणीए, सुव्रत **कच्छप** विख्यात ॥ ६ ॥
नमि जिनने **नीलुं कमळ,** पामीए पंकज मांही ।
**शंख** लंछन प्रभु नेमजी, दीसे ऊंचे आंही ॥ ७ ॥
पार्श्वनाथने चरण **सर्प,** नीळ वरण शोभित ।
**सिंह** लंछन कंचन तणुं, वर्धमान विख्यात ॥ ८ ॥

अचलपुरचा राजा फार प्रजावत्सल नि प्रतापी होता. त्याचें नांव होतें **सिंहरथ**. त्याची सत्ता नि कीर्ति; त्याचा न्याय नि त्याची नीति; त्याचें धर्माचरण नि यश आणि त्याचे सद्‌गुण सर्वत्र पसरले होते. त्यांचें गान चाऱ्ही दिशांत होत असे. त्या राजाच्या सेवेंत असंख्य सेवक हजर असत. अमर्याद होतें त्याचें वैभव, लक्ष्मीनें परिपूर्ण होता त्याचा खजिना आणि राजा स्वतः देखील स्वतःच्या नांवाप्रमाणें पराक्रमी होता; तर मग त्याचे शत्रु हरणांप्रमाणें दे माय धरणी ठाय करीत पळत सुटत, ह्यांत नवल तें काय ?

राजाला होत्या राण्या दोन: **कनकवती** नि **शीलवती**. दोघी अत्यंत सुंदर-देखण्या नि सद्‌गुणीही होत्या. राजाला एक सद्‌गुणी मुलगी देखील होती, तिचें नांव होतें **मनोरमा**. राजकन्या म्हटलें म्हणजे तिच्या सौंदर्याच्या-लावण्याच्या बाबतींत विचारावयाचें तें काय ? ती फक्त सौन्दर्याची खाणच नव्हती, गुणांचें भांडार देखील होती. रूप नि गुण यांच्या मधुर मिश्रणानें मनोरमा जास्तच चित्ताकर्षक झाली होती. गुणांशिवायचें नुसतें-निव्वळ रूप अनर्थकारी असून कधीं कधीं तर त्यामुळें मोटमोठीं संकटें ओढवितात; म्हणूनच गुणांशिवायच्या रूपास अगदीं अळणी जेवणासारखें म्हटलें आहे.

सिंहरथ राजाचा एक अत्यंत आवडता सावकार होता, त्याचें नांव होतें **जिनदत्त शेठ**. शेठ सुद्धां दयाळू-कनवाळू नि उदार असून माणुसकीचे सर्व गुण त्यांच्यांत होते. दुःखी-कष्टी लोकांचीं दुःखें हलकीं करण्यांत ते तत्पर असत; गोरगरिबांसाठीं त्यांचा खजिना सदैव उघडा असे; स्वतःच्या दाराशीं आलेले कोणी देखील रिकाम्या हातानें जातां कामा नये, असें तर त्यांचें (त्यांच्या घरचें) ब्रीद होतें; सम्यग्दृष्टिपूर्ण नि संस्कारी जीवन जगण्याची त्यांची मोठी अभिलाषा असून त्यासाठीं त्यांचा सदैव यत्न चालू असे— असे आदर्शपुरुष होते जिनदत्त शेठ. शेठांच्या घरीं एक क्षत्रिय जातीचा नोकर होता, त्याचें नांव होतें **देवपाल**. शेठांच्या

सहवासानें जैन धर्मावर त्याची अगदीं एकनिष्ठा झाली होती आणि सद्गुरु महाराजांच्या समागमानें–त्यांचे सदुपदेश ऐकून तो जैन धर्माचीं गूढ रहस्यें समजूं लागला होता. **'विश्वांतील सर्व धर्मांत जैन धर्मच श्रेष्ठ नि परिपूर्ण आहे'**— अशा सम्यक्त्वाच्या रंगानें त्याचा आत्मा अगदीं रंगला होता. धर्मशिवायचें जीवन त्यास अप्रिय नि अगदीं एकलकोंड्या-सारखें वाटत होतें. **'जीवन वास्तविक–यथार्थ रितीनें जगण्याचें शिक्षण देणारी जर कोणती कला असेल तर ती धर्मकलाच होय'**– ही गोष्ट त्याच्या मनांत अगदीं पूर्णपणें ठसली होती. तो धर्माची किंमत श्वासोच्छ्वासापेक्षांही जास्त–प्राणाहून अधिक समजत असे. स्वतःस सभ्य, सुज्ञ नि सुसंस्कारी म्हणणाऱ्या–म्हणविणाऱ्या आजच्या महाशयां-मधील सभ्यता (!) त्याच्यांत नसल्यामुळें तो धर्मास सोंग–ढोंग व धार्मिक लोकांस ढोंगी–दंभी कधींही म्हणत नसे. असें अगदीं सात्विक (पवित्र नि सौम्य) होतें देवपाळाचें जीवन! खरोखर, साधु–संतांच्या समागमानें जीवांस काय बरें प्राप्त होत नाहीं? हें तर कबूलच करावें लागेल कीं, स्वतःच्या कल्याणासाठीं झटणारा जीव सत्संगतीनें सर्व गोष्टी मिळवूं शकतो.

पावसाळ्याचा दिवस होता तो. आकाश अगदीं भरून आलें होतें आणि सिंहगर्जनेसारखा भयानक असा ढगांचा गडगडाट चालूं होता. थोड–थोड्या अंतरावर विजा सारख्या चमकत होत्या. अव्याहतपणें (सारखा) मुसळधार पाऊस पडत होता. पाणी धो धो वहात होतें. नदी आपल्या पतीस–समुद्रास भेटण्यासाठीं अत्यंत उत्सुक झाली होती जणूं!— ती फारच जोरानें (भरधांव) वाहत होती. पाण्याचा आवाज गोंधळून टाकणारा असून मोठ–मोठ्या लाटा एकमेकांवर आदळून उत्पन्न होणारे पाण्याच्या खळखळीचें दृश्य लेच्यापेच्या माणसास तर खचितच घाबरवून सोडणारें होतें. अशा भयानक परिस्थितींत सुद्धां देवपाळ नदीकांठच्या कुरणावर गायी चारण्यासाठीं गेला होताच. थंडी वाजूं नये म्हणून त्यानें घोंगडी मात्र पांघरली होती. आपल्या काठीला टेकून एका बाजूस उभा

राहिला होता तो आणि अगदीं टक लावून पहात होता पावसाच्या पडणाऱ्या पाण्यास ( मोठ-मोठ्या थेंबांस ) नि पावसामुळें उत्पन्न झालेल्या लक्षवेधक दृश्यास. गायी सुद्धां जेथें स्वतःचें रक्षण होईलसें होतें तेथें अगदीं स्तब्ध उभ्या राहिल्या होत्या.

हळू हळू पाऊस थांबला. आकाश निरभ्र ( स्वच्छ ) झालें. गायी देखील नदीकांठच्या कुरणावर इकडे-तिकडे चरूं लागल्या. तरी सुद्धां नदीचा प्रवाह भरधांव – अत्यंत जोरानें नि धो धो आवाज करीत वहातच होता. इतक्यांत पाण्याच्या वेगामुळें नदीकांठचा एका बाजूचा भाग एकदम कोसळून पडला. साहजिकपणेंच देवपालाचें लक्ष तिकडे गेलें. कोसळून पडलेल्या भागांत त्यानें **श्रीयुगादिदेव जिनेश्वर प्रभूंची मूर्ति** पाहिली आणि आनंदामुळें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. तो स्वतःस धन्य ( कृतकृत्य ) नि पुण्यशाली ( सुदैवी ) समजूं लागला नि मनाशींच म्हणाला—'अहाहा ! मी किती सुदैवी ! रानावनांत नि वेळ ( किंवा आशा ) नसतांना देखील मला श्रीजिनेश्वर देवांचें दर्शन झालें ! संसार-समुद्र तरण्याचें सर्वश्रेष्ठ साधन मला अनायासेंच प्राप्त झालें !' " आतां तर ह्या देवाधिदेवांची एखाद्या उत्तम स्थानीं मी अवश्य स्थापना करीन, " असा दृढ संकल्प करून देवपालनें लगेच तेथें नदीच्या कांठीं एक टुमदार झोपडी बनविली व तींत प्रभूंची स्थापना ( प्रतिष्ठा ) केली आणि त्याचबरोबर स्वतःच्या हृदय-मंदिरांत देखील. त्याच वेळीं त्यानें श्रीवीतरागी देवांजवळ प्रतिज्ञा केली —— 'रोज जोपर्यंत मी त्रिभुवनाच्या स्वामींचें दर्शन घेणार नाहीं, तोपर्यंत मी अन्न किंवा पाणी कशालाही शिवणार देखील नाहीं.' अशा प्रकारें प्रतिज्ञा घेतल्यानंतर देवपाल स्वतःच्या शक्तीप्रमाणें रोज ( नियमानें ) तेथें सुंदर उपकरणीं व उत्तम साहित्य नेऊन देवांची पूजा-सेवाभक्ति करूं लागला.

श्रीवीतरागी देवांचें दर्शन आणि त्यांची भक्ति विसरून स्वैरविहारी जीवन जगणें, हें अधोगतीचें लक्षण आहे. आणि जैन दर्शनांतील गूढ

रहस्यें समजून ज्ञानयोगांत निमग्न असणें, हें सद्वर्तांचें कारक आहे—ही गोष्ट देवपाल अगदीं बरोबर समजला होता. ह्यामुळें अध्यात्मिक उन्नतीच्या मार्गी भरधांव प्रगति करण्यासाठीं त्यानें श्रीवीतरागी देवांची अनिर्बंध (विनशरती) शरणागति (Unconditional Surrender) घेतली (अर्थात् संपूर्ण आत्मसमर्पण केलें).

'श्रेयांसि बहुविघ्नानि' ह्या म्हणीप्रमाणें नेम-व्रतें करणाऱ्या लोकांवर कांहीं मनीं-घ्यानीं नसतांना अनेक विघ्नें-संकटें ओढवतात नि त्यांची विटंबनाही होते. कसोटीच्या (परीक्षेच्या) ऐरणीवर अनेक घाव सहन करून उत्तीर्ण व्हावें लागतें, तेव्हां त्याची किंमत केली जाते. साधु-संतांना स्वतःच्या जीवनांत अनेक प्रकारचीं कष्ट-संकटें सोसावीं ही लागतातच आणि ह्या सर्व कष्ट-संकटांत सावध राहून स्वतःची वाट न चुकतां (व झळ न लागतां) आपल्या निश्चित मार्गानें प्रयाण करणें, हीच साधु-संतांच्या–महापुरुषांच्या सामर्थ्याची वास्तविक (खरी) परीक्षा आहे. देवपालाच्या भक्तींत सुद्धां एकदा असाच अडथळा आला; पण तो घाबरणारा थोडाच होता? कष्ट-संकटांमुळें होणारी कसोटी (परीक्षा) म्हणजे जीवनाच्या उन्नतीचें रामबाण (पौष्टिक) औषध किंवा सिद्धरसायनच आहे, असें देवपालाचें ठाम मत होतें.

एके दिवशीं एकसारखा बेसुमार नि मुसळधार पाऊस पडूं लागला. पाणी धो धो वाहूं लागलें. विजा कडकडाट करून चमकूं लागल्या. ढगांमुळें सूर्य तर अजिबात झांकला गेला होता. सर्व वातावरणच शून्य नि उदास झालें होतें. कोठेंही दृष्टि टाका—सर्वत्र पाणीच पाणी! पृथ्वी देवी पाण्याचेच सर्व शृंगार सजली होती जणूं! चाऱ्ही बाजूंचें-सगळीकडचें होतें हें दृश्य! घराच्या बाहेर निघणें सुद्धां अगदीं अशक्य झालें होतें. आणि अशी परिस्थिति तर सतत सात दिवस राहिली!

देवपाल देखील अशा उदास नि भयानक परिस्थितींत श्रीजिनेश्वर देवांच्या दर्शनास जाऊं शकला नाहीं. "देवांचें दर्शन घेतल्याशिवाय मी

अन्न-पाणी काहींही घेणार नाहीं " – अशी त्याची प्रतिज्ञा असल्यामुळें त्यानें सात दिवस निर्जळ उपास केले.

आठव्या दिवशीं निसर्गतःच पाऊस थांबला. लगेच देवपाळ नदी-कांठच्या झोपडीजवळ देवांचें दर्शन घेण्यासाठीं पोहोंचला. सर्वप्रथम त्यानें ती झोपडी व्यवस्थित केली. नंतर श्रद्धेमुळें पवित्र ( निष्पाप ) झालेल्या भक्त देवपालानें आपले दोन्ही हात जोडले व तो देवांसमोर अगदीं नम्र-भावानें स्तुति करूं लागला – " हे देवा ! मी किती मंदभागी ! सात-सात दिवस तुझें पवित्र दर्शन देखील करूं शकलों नाहीं ! तुझी सेवा-भक्ति न झाल्यामुळें माझे हे सात दिवस तर अगदीं व्यर्थच गेले ! आज आठव्या दिवशीं तुझें दर्शन मिळाल्यामुळें माझा आत्मा कृतार्थ झाला आहे. मला बरें वाटत आहे. तुझ्या दर्शनाशिवाय मला इतर कोणत्याही वस्तूची इच्छा नाहीं. गेले सात दिवस तर शरीर सुद्धां अस्वस्थच होतें. तुझी भक्ति होऊं न शकल्यामुळें मन अगदीं आकुळ-व्याकुळ झालें होतें. आत्मा अशांतीस बळी पडला होता. सभोंवतालचें सर्व वातावरणच अगदीं शून्य नि उदास झालें होतें. हे देवा ! म्हणून मी तुझ्याजवळ अगदीं नम्रतेनें फक्त एकच प्रार्थना करतो — कोणतेंही संकट किंवा अडचण आल्याशिवाय मला तुझें दर्शन रोज-नित्य-नियमानें घडो. "

अशा प्रकारें देवपाळ देवाधिदेवांच्या समोर प्रार्थना करीत होता, इत-क्यांत ( एकाएकीं ) युगादिदेवांची अधिष्ठायिका देवी श्रीचक्रेश्वरी प्रगट होऊन देवपाळास उद्देशून म्हणाली – " हे बाळा देवपाळा ! तूं ज्या युगादिदेवांचा भक्त आहेस, त्याच देवांची मी अधिष्ठायिका देवी आहे. माग; तुला जें कांहीं ( वरदान ) वरदान मागावयाचें असेल, तें माग. "

प्रभुभक्तीच्या रसांत निमग्न-तल्लीन झालेल्या देवपाळानें उत्तर दिलें-" हे देवी ! मला माझ्या जीवनांत फक्त एकच मागणी-याचना करावयाची आहे; आणि ती म्हणजे श्रीजिनेश्वर देवांची सेवा-भक्ति मला नेहमीं-अविच्छिन्नपणें मिळो. त्याशिवाय मला कांहीं एक मागा-

वयाचें नाहीं."

"हे देवपाल ! ह्यांत तर तूं मागितलेंस तें काय ? मी तर ह्या लोकांतील सर्व मनःकामना पूर्ण करण्यासाठीं आले आहे. मी तुझ्यावर प्रसन्न झाले आहे, म्हणून दुसरें कांहीं माग."

"हे देवी ! ऐहिक सुखासाठीं मी देवाची भक्ति करीत नाहीं; तर मोक्षसुखाच्या प्राप्तीसाठींच ही माझी देवभक्ति आहे; म्हणून मी जी याचना–मागणी केली, त्यांतच तूं मला साहाय्य कर."

"बाळ देवपाला ! त्यांत तर माझी संपूर्ण मदत आहेच. तुझ्या देव–भक्तीनें तर माझें येथें आकर्षण झालें आहे. ( तुझी भक्ति पाहून तर मी येथें आले आहे ); म्हणून तूं दुसरें कांहीं वरदान माग. देव–देवींचें दर्शन कधीं निष्फळ जात नसतें."

"हे देवी ! दुसरें कांहीं मागणें म्हणजे हत्ती विकून गाढवांची खरीदी करण्यासारखें आहे; म्हणून मला कांहीं एक मागावयाचें उरत नाहीं."

"हे देवपाल ! तुझा ( भक्तीवरील ) दृढनिश्चय – अढळ श्रद्धा पाहून मी तुला वरदान देते—तूं अगदीं थोड्याच कालानंतर ह्याच नगरीचा राजा होशील."

"हे देवी ! मला राज्याची इच्छा नाहीं व राजा होण्याची इच्छा त्याहून नाहीं. कारण कीं, असें म्हटलेंच आहे—राजेश्वरी तो नरकेश्वरी. जो राजा देवाची भक्ति आणि धर्माचें आराधन करीत नाहीं आणि जर त्याचें मरण झालें, तर तो नरकाचा वांटेकरी बनतो आणि माझी नरकांत जाण्याची इच्छा नाहीं. राजा झाल्यानें जर परिणामस्वरूप शेवटीं नरकांत जावें लागत असल्यास मला तसला राजा बनण्याची यत्किंचित् देखील आवश्यकता नाहीं."

"हे देवपाल ! जरी तूं राजा झालास तरी तुला नरकांत जावें लागणार नाहीं, हें मी तुला खात्रीनें सांगते. म्हणून तूं खुशाल राज्यसुखाचा उपभोग कर. दैवी वरदान कधींही खोटें होत नसतें."

"हे देवी ! माझी इच्छा नसतांना देखील तूं मला 'राजा होशील,' असें वरदान दिलें आहेस; म्हणून भविष्यांत जें कांहीं होणार असेल, तें होईना कां !"

"हे देवपाल ! तुझी इच्छा नसेना कां, पण तूं राजा होणार, हें अगदीं निश्चित," असें सांगून श्रीचक्रेश्वरी देवी अदृश्य झाली.

नंतर भक्तिभावानें-ओथंबलेल्या हृदयानें देवपालानें देवांची सेवा-भक्ति (दर्शन, पूजा, स्तुति वगैरे) केली व तो आनंदा-आनंदानें घरीं परतला. सात दिवसाच्या निर्जळ उपवासाचें आज पारणें होतें तरीही तो भुकेनें व्याकूळ झाला नव्हता किंवा मी उपवास केव्हां सोडीन-पारणें केव्हां करीन अशी त्यास मुळींच घाई नव्हती. हा कसला प्रभाव असूं शकेल बरें ? देवाच्या दृढ भक्तीचा आणि देवाबद्दल असलेल्या नितांत श्रद्धेचाच हा प्रभाव होता, असें निश्चितपणें म्हणावें लागेल.

देवपाल तर जिनदत्त शेटांचा एक सामान्य नोकरच होता. परंतु केव्हां केव्हां नोकराच्या चांगुलपणामुळें मालकास देखील गौरव प्राप्त होतें. जिनदत्त शेटांना सुद्धां देवपालास सात उपासांचें पारणें करविण्याची सुवर्णसंधि लाभली होती. त्यांनीं मोठ्या आनंदानें त्याचें गौरव केलें व मानापानानें आणि उत्साहानें त्यास (गव्हल्याच्या) खिरेचें पारणें करवलें. अशा प्रकारें जिनदत्त शेटांनीं आपल्या जीवात्म्यास कृतार्थ-धन्यभागी बनविलें.

# [ २ ]

एकदा अचलपुर नगरीच्या बाहेर असलेल्या एका मोठ्या भव्य बागेंत महा तपस्वी नि उग्र ध्यानी मुनिराज विराजमान होते. त्याग नि तप, क्षमा नि दया आणि ध्यान व समभाव या सर्वांच्या प्रभावानें त्या महर्षींना तिन्ही लोकालोकांचें (ज्ञान) प्रकाश करविणारें केवलज्ञान प्राप्त झालें. त्यागलीच देवांनीं केवलज्ञान-महोत्सव साजरा केला. देवांनींच साजरा केलेला तो उत्सव, मग त्यांत कमतरता ती कोणती असूं शकणार ?

केवलज्ञान-महोत्सवाची वार्ता लागतांच गांवांतील भाविक लोक त्या बागेंत केवलज्ञानी परमेश्वरांना नमस्कार करण्यासाठी अगदी आनंदित हृदयानें जाऊं लागले.

गांवकऱ्यांची ये-जा वाढलेली पाहून राजानें आपल्या सेवकास सहजिकपणेंच विचारलें- "हे सर्व गांवांतील लोक कोठें जात आहेत ?"

"महाराजाधिराज ! आपल्या गांवाच्या बाहेर असलेल्या बागेंत एक केवलज्ञानी प्रभु आले आहेत त्यांना नमस्कार करण्यासाठीं आपल्या परिवारासह सर्व नगरजन जात आहेत," सेवकानें नम्रपणें उत्तर दिलें.

राजानें स्वतः देखील देवांना नमस्कार करण्यासाठीं जाण्याची इच्छा प्रगट केली आणि त्यासाठीं सर्व आवश्यक तयारी करण्यास सांगितलें.

आपल्या ऋद्धि-सिद्धीस व राजवैभवास शोभेल अशा थाटामाटानें राजा सिंहरथ त्रिलोकाच्या तारक अशा देवांना नमस्कार करण्यासाठीं निघाले त्यावेळीं तर महाज्ञानी देव रत्नांनीं सुशोभित सुवर्णाच्या सिंहासनावर विराजमान होऊन दैवी जीवांना उद्देशून संसार-दुःख-निस्तारिणी आणि कल्याणमयी धर्मदेशना देण्यास सुरवातच करणार होते. देशना ( उपदेश ) ऐकल्यानंतर सिंहरथ राजानें विचारलें – "हे देवा ! आतां माझें आयुष्य किती शिल्लक राहिलें आहे ?"

"तुझें आयुष्य तर फारच कमी आहे," ज्ञानी देवांनीं सांगितलें.

"कमी म्हणजे तरी किती ?"

"फक्त तीन रात्रंदिवसांचें ( अहोरात्रींचें )."

"बस ! झालें ! मी फक्त तीनच दिवस जगणार ?"

"निश्चित. जीवनांत जें कांहीं खास खास करण्यासारखें असेल तें तें सर्व करून घेणेंच बरें."

"हे देवा ! इतक्या-अगदीं थोड्याशा वेळांत तर मी काय काय करूं शकेन ?"

"जर जीवात्म्यानें दृढनिश्चय केला, तर तो अगदीं थोड्या वेळांत

( दिवसांत ) सुद्धां केवळज्ञानही प्राप्त करूं शकतो. "

" हे देवा ! तर मग मीं काय करावें ? "

" बारा व्रतांचा अंगीकार कर अर्थात् बारा व्रतें घे. "

देवांचा हा सदुपदेश ऐकून सिंहरथ राजानें बारा व्रतांचा अंगीकार केला. आतां त्यास संसार म्हणजे बंदीशाळा (जेल) आहे, असें वाटूं लागलें. राजसुख-राजवैभव तर त्याच्या मनानें अगदीं तुच्छ झालें. मरण अगदीं जवळ येऊन ठेपल्यामुळें आणि देवांची हितकर व वैराग्य उत्पन्न करणारी देशना ( उपदेश ) ऐकल्यामुळें राजाचें मन चारित्र्य ( संन्यास ) घेण्यासाठीं फारच आतुर झालें होतें. डोक्यावर विचारांचें ओझेंच झालें होतें जणूं - " इतक्या-अगदीं थोड्याशा वेळांत सर्व पुद्गल लीला ( सांसरिक कार्यें ) आटोपून मी आत्म्याचें श्रेय कशा प्रकारें साधूं शकेन ? राज्य कोण संभाळेल बरें ? मुलीस-मनोरमेस कोणाच्या स्वाधीन करावें ? " अशा प्रकारें विचारांचें थैमान चालूंच होतें आणि ह्याच विचारांमुळें राजा अगदीं गोंधळून गेला होता. तेवढ्यांतच राज्याची अधिष्ठायिका देवी एकदम प्रगट झाली व राजास म्हणाली - " हे राजा ! तूं उगाच चिंता का करतोस ? सर्व कांहीं चांगलेंच होईल. "

" पण हे देवी ! माझें आयुष्य अगदींच थोडें शिल्लक राहिलें आहे व मला संयम घेण्याची उत्कट अभिलाषा आहे. काय करूं ? कांहीं एक उपाय सुचत नाहीं. "

" हे राजा ! मी सांगते, तसें कर. मी पंचदिव्य प्रगट करीन आणि त्या पंचदिव्यांकडून ज्याच्या गळ्यांत (फुलांचा) हार घातला जाईल त्यास तूं आपलें राज्य आणि पुत्री मनोरमा अर्पण कर आणि नंतर अगदीं आनंदानें चारित्र ( संन्यास ) घे. " अशा प्रकारें देवीनें राजास सोपा मार्ग काढून दिला आणि ती अदृश्य झाली. ( आपल्या स्थानीं निघून गेली. )

पंचदिव्यें प्रगट झालीं. राजा, मंत्री आणि इतर सर्व अधिकारी वर्ग

यांनी मिळून त्या पंचदिव्यांना नगरांतील मोठ-मोठ्या रस्त्यांतून फिरविलें तेव्हां तर देवपालाच्याच गळ्यांत ( फुलांचा ) हार घातला गेला. अशा प्रकारें श्रीचक्रेश्वरी देवीनें देवपालास दिलेलें वरदान फळास आलें.

सिंहरथ राजानें देवपालाशीं आपल्या मुलीचें–मनोरमेचें लग्न लावलें आणि सर्व राज्य कारभार त्यास सोपवला. हें सर्व काम झटपट आटोपून सिंहरथ राजानें केवळज्ञानी देवांजवळून श्रीभागवती दीक्षा घेतली आणि आत्मश्रेयासाठीं झटूं लागला. अगदीं थोड्याशा आयुष्यांत देखील संयमाचें यथास्थित पालन करून हे नूतन संयमी मुनि सौधर्म देव लोकांत देव झाले.

स्पर्शकांत ( परिस ) मण्यापेक्षांही चारित्राचा प्रभाव जास्तच आहे. ह्या विश्वांत जितके म्हणून महापुरुष–साधु-संत भूतकाळीं होऊन गेले, भविष्यकाळीं होतील आणि आज–वर्तमानकाळीं विद्यमान आहेत—ते सर्वच्या सर्व अगदीं निर्मळ चारित्राच्या प्रभावानेंच होत, हें नक्की समजा. परमोच्च कोटीचें जीवन जगण्यासाठीं आणि परलोक उत्तम करण्यासाठीं ( सुधारण्यासाठीं ) संयमाच्या मार्गानें प्रयाण करण्याशिवाय गत्यंतरच नाहीं. पहा, सिंहरथ राजानें तर फक्त दोन दिवसांच्या चारित्राच्या प्रभावानेंच देवगति मिळवली.

[ ३ ]

देवीच्या वरदानाप्रमाणें देवपाल राजा तर झाला; परंतु ज्याप्रमाणें खाऊन मातलेले जुने नोकर नव्या अधिकाऱ्याचें म्हणणें थट्टेनें उडवितात आणि जर संधि मिळाली तर त्या नव्या अधिकाऱ्यास त्याच्या स्थानावरून च्युत करतात त्याचप्रमाणें देवपालाचीही स्थिति झाली होती. त्याची आज्ञा किंवा म्हणणें कोणीही ऐकत देखील नसत. देवपाल अगदीं गोंधळून गेला होता. नवीन मंत्रीमंडळ बनविण्यांत सुद्धां बऱ्याच अडचणी होत्या–जुन्या मंत्रीमंडळाचा रोष सहन केल्याशिवाय हें नवीन मंत्रीमंडळ बनविणें अश-

शास्त्र-विधीप्रमाणें देवांना नमस्कार करून राजा स्वतःस योग्य अ आसनावर बसला आणि केवळज्ञानी देवांची देशना ऐकण्यासाठीं उत्सु झाला.

दैवी जीवांचा उद्धार करणाऱ्या श्रीकेवळज्ञानी देवांनीं सोनेरी ( सुवर्ण कमळावर विराजमान होऊन सर्व जीवांचें क्षेम-कल्याण करणारी अमृ मयी देशना ( उपदेश ) देण्यास प्रारंभ केला. त्यांनीं द्रव्यपूजा आणि भा पूजा यांची गूढ रहस्यें अमृतपूर्ण शैलींत समजावून सांगितलीं. ही देश ऐकल्यामुळें देवपाल राजा देवांच्या भक्तींत जास्तच जागृत आणि उत्सा झाला. त्याच्या मनांत एक भव्य नि अत्यंत रमणीय श्रीजिनमंदिर ब विण्याची भावना उत्पन्न झाली. लगेच ह्या भावनेस मूर्तस्वरूप देण्यां आलें आणि ( स्वर्गीय ) देवभावनाप्रमाणें एक अत्यंत रमणीय जिनमंदि तयार झालें. मंदिरांत श्रीकेवळज्ञानी प्रभूंकडून देवाधिदेवांच्या सोन्याच्य मूर्तींची प्रतिष्ठा मोठया समारंभासह करण्यांत आली. अशाप्रकारें देवाधिदेवांच प्रतिष्ठा करवून देवपाल राजानें आपल्या जीवनांत एक महान पुण्य उपा र्जन केलें, प्राप्त केलेल्या लक्ष्मीचा ( पैशाचा ) सदुपयोग केला आणि स्वतःची देवभक्ति दृढ-समृद्ध केली. केवळज्ञानी देवांची वाणी, सर्व शुभ गुणांनीं अलंकृत आणि सर्व मनःकामना परिपूर्ण करणारी असल्यान तिच्यापासून दैवी जीवांना काय बरें प्राप्त होऊं शकत नाहीं ? त्यांना स काांहीं मिळूं शकतें, असें कबूल करावेंच लागेल.

देवपाल राजानें वीस स्थानकांपैकीं प्रथम अरिहंत पदाची विधिपूर्वक आराधना करण्याचें तप सुरूं केलें- मन, वचन नि शरीर यांच्या शुभ योगांनीं हिरे, मोती, माणिक ( लाल ) आणि सोनें यांच्या मोठया-किमती किमती आंगी ( शृंगार ) सजवून देवांचे अनेक प्रकारचे स्नात्र महोत्सव उजवून स्वतःचें जीवन धन्य केलें आणि त्या बरोबरच श्रीतीर्थंकरपदाचें पण उपार्जन केलें. अनेक प्रकारच्या उत्तमोत्तम साधनांनीं-उपकरणांनीं साधर्मिक भावांची भक्ति ( सेवा ) करण्याच्या सुवर्ण संधीचा फायदा राजा

नेहमीं घेत असे; असा कोणताही प्रसंग तो कधींही व्यर्थ जाऊं देत नसे. देवपाल राजानें देशा-देशांतील मोठ-मोठया तीर्थयात्रा देखील केल्या होत्या. अशा प्रकारें राजानें देव, गुरु आणि धर्म यांचें अत्यंत उत्तम प्रकारें अराधन केलें होतें.

[ ५ ]

एकदा राजा-राणी फिरण्यासाठीं गांवबाहेर गेलीं होतीं. त्यावेळीं राणीनें लाकडाची मोळी डोक्यावर घेऊन समोरून येत असलेला एक लाकूड-तोड्या पाहिला नि लगेच तिला मूर्च्छा आली. तावडतोब राजानें समय-सूचकता वापरून शीतोपचार ( डोक्यावर पाणी शिंपडणें, पंख्यानें वारा घालणें वगैरे ) केले आणि शुद्धीवर येतांच राणीस विचारलें- " एकदम तें तुला काय झालें ? "

" त्या लाकुडतोड्यास पाहून मला जातिस्मरणज्ञान झालें. "

" पण त्यांत बेशुद्ध होण्याचें काय कारण ? "

" त्या लाकुडतोडयास पहातांच मला पूर्वजन्म आठवला. "

" पण पूर्वजन्मांत देखील असें तर तूं काय पाहिलेंस ? "

" पूर्वजन्म ऐकण्यासारखा आहे. "

" तर मग सांग पाहूं. "

राणीनें स्वतःच्या पूर्वजन्माची गोष्ट सांगण्यास सुरवात केली— " मी आणि हा लाकुडतोडया पूर्वजन्मीं पति-पत्नी होतों. आमची परिस्थिति फारच दयाजनक होती- पोटभर खाणें मिळणें सुद्धां कठीण होतें. जंगलां-तून लाकडाच्या मोळ्या आणाव्या आणि त्या विकून निर्वाह करावा असा आमचा क्रम होता. "

राजानें मध्येंच प्रश्न केला- " पण तूं तर ह्या जन्मीं राणी झालीस; तर मग हा लाकूडतोडयाच कसा राहिला ? "

" स्वतःच्या वाईट कर्मांनीं ! "

"अशी तर यानें कोणकोणतीं दुष्कर्में केलीं होतीं ?"

"ऐका. एकदा आम्ही दोघे जण जंगलांत लाकडें तोडण्यासाठीं गेलो होतो, त्यावेळीं तेथील नदीच्या कांठीं श्रीवीतरागी देवांचें दर्शन होतांच मी त्यांची यथाशक्ति भक्ति-सेवा, पूजा केली आणि माझ्या जीवात्म्यास पवित्र केलें. नंतर मी माझ्या पतींना देवांस भक्तिभावानें नमस्कार करण्यासाठीं नम्रपणें सांगितलें; तेव्हां तर ते माझ्यावर फारच रागावले आणि म्हणाले– 'दगडाच्या बाहुल्यास नमस्कार तो कशाला ? तूं स्वतः तुझें कल्याण कर आपली !' अशा प्रकारें देवाधिदेवांची घोर–घोरतम आशातना (निंदा व अवहेलना) केल्यामुळें ते (माझे पति) स्वतःचा देह सुटल्यावर पुनः निर्धन कुळांतच जन्मले, फिरून लाकुडतोडयाच झाले आणि देवाच्या भक्तीच्या प्रभावानें मी आज राजपत्नी झाले आहे."

समग्र विश्वांत चार सत्तांचें साम्राज्य आहे. ह्या चार सत्तांपैकीं कर्मसत्ता ही एक असून ती आपलें शासन सर्व जीवांवर विशेष प्रकारें चालविते. जीवांनीं स्वतः केलेल्या कर्मांप्रमाणें कर्मबंध (प्रारब्ध, दैव) तयार होतात आणि त्या कर्मबंधाप्रमाणें जीवन बनतें. कर्मसत्ता जीवांना पाहिजे तसें नाचवूं शकते म्हणूनच तिचे कर्तृत्व अत्यंत विचित्र (न कळण्यासारखें) आहे आणि शास्त्रांत देखील म्हटलें आहे — '**कर्मणां गहना गतिः।**'

राणीनें सांगितलेला लाकुडतोड्याच्या पूर्वजन्माचा वृत्तांत ऐकून राजानें त्यास जवळ बोलावलें आणि म्हटलें — "बाबारे ! पूर्वजन्मीं तूं श्रीजिनेश्वर देवांची घोर आशातना केल्यामुळें ह्या जन्मीं तुला दुर्दशा आणि दुःखें भोगावीं लागत आहेत; म्हणून दुःखांना दूर करण्यासाठीं तूं श्रीजिनेश्वर देवांची भक्ती कर, धर्माची आराधना कर."

लाकुडतोडयाचा जीवात्माच गुरुकर्मी (अशुभ कर्मांनीं भरलेला) आहे आणि म्हणूनच तो आपलें म्हणणें समजूं शकत नाहीं, असें पाहून राजानें त्यास जाण्याची परवानगी दिली आणि राजा–राणी आपल्या

महालांत परतली.

अशा प्रकारें त्या धार्मिक दंपतीनें कित्येक वर्षें ऐहिक सुखांचा व राज्य-वैभवाचा उपभोग घेतला.

[ ६ ]

मनोरमा राणीस एक प्रतापी मुलगा झाला, त्याचें नांव ठेवलें होतें देवसेन. प्रबळ पुण्याशिवाय राजकुळांत जन्म मिळणें फारच कठिण आहे. देवसेन सुद्धां अत्यंत पुण्यशाली-सुदैवी होता. हळूहळू देवसेनानें तारुण्यांत प्रवेश केला आणि एका सुशील व सुरूप राजकन्येशीं त्याचें लग्न झालें.

आतां आतां देवपाल राजा विशेषें करून धर्माराधनांतच निमग्न रहात असे. राज्याचा कारभार त्यानें हळूहळू कमी करण्यास सुरवात केली होती. संसारातील सुखें आणि राज्यवैभव आतां त्यास निःसत्त्व दिसूं लागलीं होतीं– ऐहिक सुखास तर तो कंटाळला होता, राज्यकारभार तर त्यास एखाद्या ओझ्याप्रमाणें वाटूं लागला होता. त्याच्या आत्म प्रदेशांत वैराग्याचा सुवास दरवळल्यामुळें संसारांतील आसक्तीरूपी दुर्गंधीस आपला गाशा गुंडाळावा लागला होता. स्वतःचा पुत्र देवसेन राज्य करण्यास योग्य झालेला आहे, असें पाहून देवपाल राजानें त्यास राज्याभिषेक केला. संपूर्ण राज्यकारभार त्याजकडे सोंपवला. नंतर देवपाल राजानें श्रीचंद्रप्रभु देवांजवळून निवृत्तिप्रधान चारित्राचा अंगीकार केला ( संन्यास घेतला ). मनोरमा राणी देखील स्वतःच्या पतीला अनुसरणारी असल्यामुळें तिनें सुद्धां संयमाचें ग्रहण केलें आणि स्वतःच्या आत्म्यास कृतकृत्य केलें.

श्रीचंद्रप्रभु देवांजवळून दीक्षा घेतल्यानंतर निरतिचारणें संयमाचें पालन करून अत्यंत घोर–कठोर तपश्चर्या करून आणि नऊ पूर्व व अकरा अंगें यांचें पठन–पाठन करीत करीत कर्मांची निर्जरा करून श्रीअरिहंत पदाची आराधना करीत असतांना स्वतःच्या मृत्युलोकींच्या ह्या शरीराचा

त्याग करून देवपाल प्राणत नांवाच्या दहाव्या देवलोकीं देव झ
साध्वी श्रीमनोरमा सुद्धां याच देवलोकांत देव झाली आणि ते दो
तेथें मित्र-मित्र म्हणून राहूं लागले.

आयुष्य पूर्ण झाल्यानंतर राजा देवपाल प्राणत देवलोकांतून नि
महाविदेह क्षेत्रांत श्रीतीर्थंकर देव होईल आणि राणी मनोरमा देखी
त्याच क्षेत्रांत त्याच श्रीतीर्थंकर देवाची गणधर होऊन शाश्वत अशा प
सुखास प्राप्त करील.



# (६) प्रारंभिक परीक्षेचीं जुनीं प्रश्नपत्रे

[ अखिल भारतवर्षीय जैन समाजाची एकमेव उत्कृष्ट शिक्षण संस्था श्री **जैन तत्त्वज्ञान विद्यापीठ-पुणें** या संस्थेकडून ता. १४-५-१९४ (संस्थेच्या स्थापना दिना) पासून आजपर्यंत नऊ वेळां **प्रारंभिक परीक्ष** घेण्यांत आली. या परीक्षेत वेगवेगळ्या प्रांतांतील **२२५ पाठशाळांकडू** **४७५० सुदैवी परीक्षार्थी** बसले व उत्तीर्ण झाले. या पाठ्यक्रमाप्रमाणे अभ्यास करणें सोपें जावें व परीक्षेंत प्रश्न कशा प्रकारें विचारले जातात, हे लक्षांत यावें म्हणून त्या सर्व प्रश्नपत्रिका येथें देत आहोंत. ]

( प्रत्येक प्रश्नपत्रावरील सूचना — **प्रश्नांचीं उत्तरें समजून व मुद्देसूद लिहा. शुद्धलेखन नि सुलेखन यांचे ५ गुण. एकूण गुण १००.** )

## परीक्षा १ ली		ता. २७-६-१९४८

१. 'एगिंदिया' पासून 'मिच्छा मि दुक्कडं' पर्यंत आणि 'जाव अरिहंताणं' पासून 'अप्पाणं वोसिरामि' पर्यंत — हे दोन्ही सूत्र-विभाग शुद्ध लिहा. १०

२. (i) १६ सतींपैकीं कोणत्याही १० सतींचीं नांवें लिहा. १०

(ii) १० मोठ्या तीर्थांचीं नांवें लिहा. त्यांतून तुम्ही कोण-कोणत्या तीर्थांचीं यात्रा केली आहे ? १०

३. खालील शब्दांपैकी कोणत्याही ५ शब्दांचें संदर्भासहित अर्थ लिहा. १०

तेइंदिया, जंभाइएणं, लोए, संघाइया, संजमजात्रा, मोणेणं, पढमं.

४. प्रभु श्रीमहावीर देवांचें संक्षिप्त चरित्र २५ ओळींत लिहा. १५

५. रिकाम्या जागीं योग्य शब्द लिहा. १४

[अ] (i) .... देवांचें लंछन बैल होतें. (ii) ... देवांचें लंछन हत्ती होतें. (iii) ... देवांचें लंछन चंद्र होतें. (iv) ... देवांचें लंछन कासव होतें.

[ब] (i) श्रीपार्श्वनाथ देवांचें लंछन .... होतें. (ii) श्रीनेमनाथ देवांचें लंछन .... होतें. (iii) श्रीसुमतिनाथ देवांचें लंछन ... होतें. (iv) श्रीविमलनाथ देवांचें लंछन .... होतें.

[क] ३ ऱ्या, १२ व्या, १५ व्या आणि १९ व्या श्रीतीर्थंकर देवांचीं नांवें व लंछनें लिहा.

६. उत्तरें द्या. १५

(i) पंचिंदिय सूत्रांत सांगितलेले गुरु महाराजांचे छत्तीस गुण लिहा. (ii) नवकार मंत्रांतील पांच परमेष्ठींचीं नांवें लिहा. (iii) 'एगिंदिया, बेइंदिया, तेइंदिया, चउरिंदिया, पंचिंदिया' — ह्याचा अर्थ स्पष्ट समजावा. ह्या पांच विभागांपैकीं तुम्ही कोणत्या विभागाचे आहांत ?

७. उत्तर लिहा. २१

(i) देवपालास कशा प्रकारें राज्य मिळालें ? सविस्तर लिहा. (ii) राणी मनोरमा हिला जातिस्मरणज्ञान झालें तेव्हां तिनें पूर्वजन्मांतील कोणती गोष्ट देवपाल राजास सांगितली ? वर्णन करून लिहा. (iii) सिंहरथ राजानें स्वतःच्या राज्याचा उत्तराधिकार (वारसा) कोणास दिला ? राजास उत्तराधिकारी (वारस) का शोधावा लागला ? समजावा.

## परीक्षा २ री ता. ७-११-१९४८

१. खालील गाथांशांचा अर्थ समजवा. १५

(१) 'अभिहया वत्तिया' पासून 'तस्स मिच्छा मि दुक्कडं' पर्यंत (२) अरिहंते कित्तइस्सं, चउवीसं पि केवली.

२. खालील सूत्रें शुद्ध नि स्वच्छ–सुंदर अक्षरांत लिहा. १५

(१) श्री पंचिंदिय सूत्र. (२) श्री करेमि भंते सूत्र.

३. खालील शब्दांतील कोणतेही ५ शब्द संदर्भासह समजवा. १५

सव्वेसिं, पंचसमिओ, दुविहं, तिविहेणं, संघाइया, नियमसंजुत्तो, सागरवरगंभीरा, धम्मतित्थयरे.

४. प्रभु श्रीमहावीर देवांच्या (दीक्षा घेतल्यानंतरच्या) सहनशीलतेच्या एका प्रसंगाचें १५ ओळींत वर्णन करा. १०

५. खालील प्रश्नांचीं उत्तरें द्या. ९

(१) श्रीतीर्थंकर देव म्हणजे कोण? (२) २४ देवांचीं नांवें तुम्हीं कोणत्या सूत्रांत शिकलांत? (३) १ ल्या, ५ व्या, ९ व्या, २१ व्या नि २३ व्या देवांचीं लंछनें (चिह्नें) लिहा.

६. तुम्हांस येत असतील तीं, १२ महासतींचीं नांवें लिहा. ६

७. जिनदत्त शेठांचा एक अगदीं सामान्य नोकर देवाच्या भक्तीच्या प्रभावानें राजा कसा झाला? सविस्तर लिहा. १०

८. तुम्ही जीं सूत्रें शिकलां, त्यांतून तुम्हांस कोणतें सूत्र अगदीं चांगलें व शुद्ध लिहितां येतें? ५

९. रिकाम्या जागा भरा. १०

(१) श्रीशत्रुंजय गिरिराजावर... देव विराजमान आहेत. (२) श्रीतारंगा तीर्थांत.... देव विराजमान आहेत. (३) श्रीतळाजा तीर्थांत.... देव विराजमान आहेत. (४) श्रीकदंबगिरि तीर्थांत....देव विराजमान आहेत. (५) श्रीगिरनार

महातीर्थांत... देव विराजमान आहेत.

## परीक्षा ३ री ता. ३०-७-१९४९

१ खालील सूत्रें शुद्ध लिहा. १५

(१) श्री नवकार महामंत्र. (२) श्री सामाइयवयजुत्तो सूत्र.

२. उत्तरें लिहा. १०

(i) 'करेमि भंते सूत्रां'त तुम्ही काय काय शिकलां ? सविस्तर लिहा. (ii) 'खमासमण सूत्र' अर्थासह समजवा.

३ खालील शब्दांपैकीं कोणत्याही ७ शब्दांचे संदर्भासह अर्थ लिहा. १४

जाव, पुप्फदंतं, लोए, सव्वसाहूणं, खमासमणो, सिद्धाणं, जावणिज्जाए सुहराई, वीअक्कमणे.

४. उत्तरें द्या. १३

(i) कोणत्याही ७ तीर्थांचीं नांवें लिहा व ठाऊक असल्यास तीं कोठें–कोणत्या प्रांतांत आलीं आहेत, हें देखील लिहा. (ii) ६ व्या, ८ व्या, ९ व्या, १३ व्या, १७ व्या आणि १९ व्या देवांचीं नांवें व लंछनें (चिन्हें) लिहा.

५. श्रीमहावीरस्वामी देवांनीं समस्त विश्वास केव्हां नि कोणता उपदेश दिला ? त्यांपैकीं तुम्ही स्वतःच्या आचरणांत किती ठेवला ? २० ओळींत उत्तर लिहा. १५

६. उत्तरें लिहा. १५

(i) देवाच्या दृढ भक्तीमुळें काय फायदा होतो ? पाठ्यपुस्तकांतील प्रसंगाच्या आधारें १५ ओळींत उत्तर लिहा. (ii) पूर्वजन्मींची लाकुडतोड्याची वायको ह्या जन्मीं राणी मनोरमा झाली; परंतु तिचा पूर्वजन्मींचा पति (तो लाकुडतोड्या) तर ह्या जन्मीं सुद्धां पुनः लाकुडतोड्या (भिल्ल) च झाला, असें का ? कारणासह सविस्तर समजवा.

५. खालील शब्दांपैकीं कोणत्याही ९ शब्दांचे अर्थ लिहा. ९

सिद्धा, निच्चं, देहि, सारं, वंदे, इच्छं, तस्स, हुज्ज, ठामि, संति, जोगं, जाव, देव, अम्ह, दिज्ज.

६. रिकाम्या जागीं योग्य शब्द लिहून वाक्यें पूर्ण करा. ६

(i) अचलपुर नगरांत.......राजाच्या राज्यांत.......शेठाच्या घरीं......नांवाचा एक देवभक्त नोकर रहात होता. (ii) सिंहरथ राजानें .......मुनी जवळून दीक्षा घेतली. (iii) पंचदिव्य प्रगट झाल्यावर ...... च्या गळ्यांत माळा घातली गेली. (iv) देवसेनाच्या वडिलांचें नांव......व आईचें नांव.......होतें.

७. रिकाम्या जागीं योग्य शब्द लिहून खालील गाथांशांचा अर्थ समजवा. १०

(i) मयं.......बुहाणं (ii) वाणी......देवि ! सारं (iii) इह.......संताइं.

८. रिकाम्या जागीं योग्य शब्द लिहून प्रभु श्रीमहावीर देवांचें सुसंबद्ध चरित्र तयार करा. १५

प्रभु श्री......देवांचा जन्म......नगरांत झाला होता. बालक्रीडा करतांना शौर्य नि पराक्रम दाखविल्यामुळें (त्यांचें नांव)...... पडलें. आई-वडिलांनीं शिक्षणासाठीं.......दाखल केलें, तेव्हां तेथल्या तेथेंच......व्याकरण रचलें. त्या प्रभूंच्या सेवेंत-तैनातींत ......देव हजर असत. प्रभूंनीं......वर्षांच्या वर्षी ऐन तारुण्यांत.......दीक्षा घेतली. दीक्षा घेतल्यानंतर......नांवाच्या एका दृष्टिविष......समजाविलें-क्षमेचा प्रात्यक्षिक धडा शिकविला, हा प्रसंग......आश्चर्यकारक आहे. .......एका वेळीं काउस्सग्ग ध्यानांत अगदीं तल्लीन झाले होते, तेव्हां......प्रभूंच्या कानांत खिळे ठोकून महान् उपसर्ग केला. नंतर त्या थोर नि दिव्य

एकूण परिवार.......होता,......महाराज प्रभूंचे मुख्य गणधर होते. प्रभूंनी......वर्षे चारित्राचें पालन केलें. दीक्षा घेतल्यानंतर ......वर्षांनीं त्यांना केवळज्ञान झालें. केवळज्ञानी अवस्थेंत....... वर्षे प्रभुंनीं ह्या पृथ्वीतलावर मोठ-मोठे महान् उपकार केले आणि ......व्या वर्षी......तीर्थांत ते निर्वाण पावले. आज आपण त्या......प्रभूंच्या शासनांत आराधना-धर्म करीत आहोत. त्या प्रभूंच्या आत्मकल्याण करविणाऱ्या वचनांवर ( उपदेशावर ) आपण......ठेवली पाहिजे.

## परीक्षा ६ वी ता. २७-७-१९५२

१. खालील शब्दांपासून सुरू करून संपूर्ण सूत्रें लिहा. (कोणतींही तीन) १५

( १ ) सुविहिं च पुप्फदंतं.......( २ ) एगिंदिया बेइंदिया......

( ३ ) जाव नियमं... ( ४ ) चारिज्जइ जइ वि....

२. खालील सूत्रांपैकीं कोणत्याही एका सूत्राचा भावार्थ, तुम्ही जसा शिकला असाल तसा, लिहा. १०

( १ ) श्री लोगस्स सूत्र ( २ ) श्री करेमि भंते सूत्र.

३. जं किंचि सूत्राच्या प्रश्नोत्तरांतून तुम्ही काय काय शिकलां ? ८

४. पाठयपुस्तकांतील जितक्या सूत्रांचा 'परिमल' विभाग तुम्हीं वाचला, त्यांपैकीं तुम्हांस कोणत्या सूत्राचा 'परिमल' विभाग जास्त आवडला ? कां ? १०

५. खालील शब्द कोणत्या सूत्रांत येतात ? त्यांचा कोणकोणत्या शब्दांशीं जास्त संबंध आहे ? अर्थासह समजवा. १५

परत्यकरणं, हियएण, तिदंडविरयाणं, वियट्टछउमाणं, नियमसंजुत्तो.

६. उत्तरें लिहा. १६

[ क ] रिकाम्या जागीं योग्य शब्द लिहून वाक्यें पूर्ण करा.

( i ) तारंगा तीर्थांत... चें लंछन पाहून आपण सांगू शकतो कीं,

ही मूर्ति श्री... देवांची आहे. (ii) तिसऱ्या आणि सातव्या देवांचीं... आणि.... हीं लंछनें होतीं. (iii) आपल्या गांवांतील जिनमंदिरा... तीर्थस्थानांतील... त जास्त आनंद... (iv) इतिहासाच्या पृष्ठा... महासतींचीं.... सुवर्णाक्षरांनीं लिहिलीं गेलीं आहेत, ह्याचें कारण एकच आहे की त्यांचा आत्मा फारच.... होता.

[ख] देवपाल सुखी कसा झाला ? १५ ओळींत लिहा.

७. खालील शब्दांपैकीं कोणत्याही ९ शब्दांचे अर्थ लिहा. ९

जावणिज्जाए, पढमं, बंभचेर, मक्कडासंताणा, निंदामि, निव्वायण-ट्ठाए, अविराहिओ, पसीयंतु, आइच्चेसु, भंते, ठ.

८. खालील प्रश्नांचीं उत्तरें तुमच्या स्वतःच्या भाषेंत सविस्तर लिहा. १२

(i) श्रीवीर प्रभूंच्या गर्भांतील अभिग्रहाप्रमाणें आपण अभिग्रह घेऊं शकतो किंवा नाहीं ? (ii) प्रभु श्रीमहावीर देवांच्या चरित्रांतून कोणतींही ३ गूढ रहस्यें सविस्तर लिहा.

## परीक्षा ७ वी ता. २-८-१९५२

१. श्री नमुत्थु णं सूत्र सुरवातीपासून 'मुत्ताणं मोअगाणं' पर्यंत शुद्ध लिहा. १५

[प्रश्न २, ३ व ४ पैकीं कोणत्याही **दोन** प्रश्नांचीं उत्तरें लिहा.]

२. तुमच्या गांवांतील कोणत्याही एका श्रीजिनमंदिराचें २५ ओळींत वर्णन करा. १५

३. खालील शब्दांपैकीं कोणत्याही ५ शब्दांचें संदर्भासह सविस्तर स्पष्टीकरण करा आणि **तेच पांच शब्द** कोणत्या सूत्रांत आले आहेत, हें देखील लिहा. १५

सद्दाए, बोहिं, सासनं, वीयराय, जि के वि, ठाणेणं, संजुत्तो.

४. खालील वस्तें तुम्ही 'प्रारंभिक पाठ्यक्रमां'त कोठें वाचलीं ?

तीं का लिहिलीं आहेत ? स्पष्ट समजवा. १५

(i) आपल्याजवळ थोडे नोकर (व थोडे पैसे) असले म्हणजे आपण कसे हुकूम सोडतो ? (ii) आपला शत्रु दुर्बळ असल्यावर त्याचें अहित–अकल्याण करण्यांत आपण कांहीं कमी करतो कां ? (iii) जर आपणास एकाद्या देवाचें साहाय्य मिळालें तर आपण पृथ्वीवर तरी चालूं कां ?

५. खालील सूत्रांपैकीं कोणत्याही दोन सूत्रांचे भावार्थ व कोणत्याही दोन सूत्रांचे ३–३ परिमल लिहा. १६

(i) श्री जगचिंतामणि सूत्र (ii) श्री इच्छकार सूत्र (iii) श्री उवसग्गहरं स्तोत्र. (iv) श्री सामाइयवयजुत्तो सूत्र.

६. विचारल्याप्रमाणें उत्तरें द्या. १०

(i) ज्या जन्मीं प्रभु श्रीमहावीर देवांना सम्यक्त्व प्राप्त झालें, तो त्यांचा कितवा जन्म ? त्याचें थोडक्यांत वर्णन लिहा. (ii) देवपाळ राजानें कोणत्या श्रीतीर्थंकर देवांजवळ दीक्षा घेतली ? (iii) देवपाळ राजानें कोणत्या तपश्चर्येची अराधना–साधना करून श्रीतीर्थंकर पदाचें उपार्जन केलें ?

७. रिकाम्या जागा भरा. ९

(i) कमळ, गेंडा आणि रेडा ........ देवांचीं लंछनें होतीं. (ii) श्रीमहावीरस्वामी देवांच्या निश्रेंत (सान्निध्यांत) ........ आणि ........ श्राविकांनीं श्रीतीर्थंकर नामकर्माचें उपार्जन केलें होतें. (iii) श्री ...... तीर्थाजवळ ...... नदीच्याकांठीं प्रभु श्रीमहावीर देवांना ........ झालें होतें. (iv) श्री नवकार महामंत्रांत ...... अक्षरें असलीं म्हणजेच तो पूर्ण म्हटला जातो. (v) वर्षांत ........ अट्टाया आयंबिल तपश्चर्येनें करण्यांत येतात (साजऱ्या होतात). (vi) ३ ऱ्या, ९ व्या आणि ११ व्या श्रीतीर्थंकर देवांचीं नांवें ......होतीं. (vii) प्रभु श्रीमहावीर

देवांचे १२ चतुर्मास ........ नगरींत झाले हो
पावापुरी, गुणाया, राजगृही आणि कुंडलपुर हीं त
प्रांताच्या ...... जिल्ह्यांत आलेलीं आहेत. (i
राजांचे गुण ...... असतात.

८. खालील शब्दांपैकीं कोणत्याही ९ शब्दांचे अर्थ लि
अविग्घेणं, लद्धे, मंतो, उवसामं, भवविरहवरं,
दयाणं, तिन्नाणं, जयउ, पणमामि, पंचिंदिया.

९. वाक्यें पूर्ण करा.
( i ) स्वतःच्या हिताची इच्छा असणारे ...
क्षेला वसण्यांत ........ कां कूं करीत नाहींत.
पुण्याच्या ...... च्या परीक्षेंत वसण्यासाठीं फार
असतात. कारण कीं, त्यांत अभ्यासक्रमाची .....
आणि गांवोगांवच्या अभ्यासु विद्यार्थ्यांशीं चढाओ
( iii ) देवपाल राजासारखी ...... भक्ति आपल्य
अत्यंत खेदाचा विषय होय.

## परीक्षा ८ वी                                        ता. १

[ प्रश्न १,२ व ३ पैकीं कोणत्याही **दोन** प्रश्नांचीं उ

१. खालील सूत्रें शुद्ध लिहा.
( i ) श्री पंचिंदिय सूत्र ( ii ) श्री करेमि भंते

२. खालील गाथा सविस्तर समजवा.
( i ) एवं नए अभिथुआ ...... सिद्धिं मम
वारिज्जइ जइ वि ........ जैनं जयति शासनम्।

३ खालील विषयांपैकीं कोणत्याही **एका** विषयावर
सुसंगत ( मुद्देसूद ) निबंध लिहा.
( i ) एकाद्या सांवत्सरिक प्रतिक्रमणाचें वर्णन

तपश्चर्येची माळ घालण्याच्या एकाद्या प्रसंगाचें वर्णन.

४. खालील प्रश्नांपैकीं कोणत्याही ३ प्रश्नांचीं उत्तरें लिहा. १८

(i) 'करेमि भंते सूत्राच्या' परिमल विभागांतून कोणतेही दोन परिमल लिहा. (ii) 'इच्छकार सूत्रा'च्या परिमल विभागांतून कोणतेही दोन परिमल लिहा. (iii) अष्टापद पर्वतावरील जिन-मूर्तीविषयीं तुम्हांस जी माहिती ठाऊक असेल, ती लिहा. (iv) शक्रस्तवांत देवांना इतकीं थोरलीं विशेषणें का दिलीं आहेत ? समजवा (v) भवनिर्वेद (संसाराबद्दल उदासीनता) व मार्गानुसा-रीपणा म्हणजे काय ?

५. खालील तीर्थें कोठें आलीं आहेत ? त्यांच्याविषयीं तुम्हांस जी कांहीं माहिती असेल, ती लिहा. १०

पावापुरी, तळाजा, शंखेश्वर, शत्रुंजय, गिरनार.

६. खालील शब्दांपैकीं कोणत्याही ९ शब्दांचे अर्थ लिहा. ९

तुज्झ, दिज्ज, भयवं, चूलावेलं, जावंत, तेसिं, इव, उ, च, बिहुं, भत्तीइ.

७. वाक्यें पूर्ण करा. ६

(i) दुसऱ्याचें खरें–खोटें...रंगवून सांगण्यांत आपण कसे व किती चाणाक्ष बुद्धीचे आहोत ! (ii) आपला शत्रु दुर्बळ असल्यावर त्याचें अहित–अकल्याण... आपण कांहीं कमी करूं कां ? (iii) आपण तर... रोज अनेक वेळां अनेकांची अवहेलना करत असूं !

८. "हे देवी ! तुझ्या वरदानाप्रमाणें मी राजा तर झालो, पण माझ्यावर मोठ–मोठीं संकटें ओढाविलीं आहेत"— हें वाक्य कोण म्हणतें ? प्रसंगासह १० ओळींत स्पष्टीकरण करा. १०

९. रिकाम्या जागीं योग्य शब्द लिहा. १०

(i) प्रभु श्रीमहावीर देवांनीं... वेळां १५–१५ उपवासांची

तपश्चर्या केली होती. ( ii ).... महासतीनें श्रीवीर प्रभूंना उडि-दांची अळणी उसळ ( नुसते शिजविलेले उडीद ) मधुकरींत देऊन पारणें करविण्याच्या सुवर्ण-संधीचा फायदा घेतला होता. ( iii ) घोडा आणि गेंडा, हीं... आणि... देवांचीं लंछनें ( चिह्नें ) होतीं. ( iv ) सध्यांची विकट परिस्थिति सोडविण्यासाठीं ( उपाय-योजना म्हणून ) अनेकांत...च्या शिक्षणाची आज संपूर्ण विश्वास नितांत-फारच आवश्यकता आहे आणि त्याच कार्यासाठीं आज आपली श्री जैन... विद्यापीठ जीवापाड प्रयत्न-मेहनत करीत आहे. ( v ) श्रीमहावीर देवांना... सापानें दंश केला, तेव्हां लाल....च्या ऐवजीं पांढरें शुभ्र... निघालें होतें.

## परीक्षा ९ वी                    ता. २१-७-१९५५

१. ' श्री उवसग्गहरं स्तोत्र ' व ' श्री सामाइयवयजुत्तो सूत्र ' यांपैकीं कोणतेंही एक सूत्र शुद्ध लिहा. १५

२. ' धार्मिक शिक्षण हें आपलें पुढील आयुष्य सुधारण्याचें एक अत्युत्तम-उत्कृष्ट साधन आहे ' या विषयावर २५ ओळींचा निबंध लिहा. १५

३. खालील सूत्रांपैकीं कोणत्याही २ सूत्रांचा ' भावार्थ ' लिहा. १०

( i ) श्री नवकार महामंत्र ( ii ) श्री अन्नत्थ सूत्र ( iii ) श्री जय वीयराय सूत्र.

४. खालील शब्दांपैकीं कोणत्याही ९ शब्दांचे अर्थ लिहा. ९

सव्वेसिं, थुणेमि, वंदामि, वत्तिया, पावाणं, अभग्गो, महिया, सावज्जं, छिन्न, विदिसि, पायालि.

५. खालील शब्दांपैकीं कोणत्याही ५ शब्दांचें संदर्भासह स्पष्टीकरण करा. १५

अरिहंताणं, उज्जोअगरे, कल्लाणकंदं, भवनिव्वेओ, पडिक्कमामि, दुग्ग-दोगच्चं, तिरिअलोए.

६. विचारल्याप्रमाणें उत्तरें लिहा. १८

(i) लाकुडतोड्यास पाहून राणीस पूर्व जन्माची आठवण झाली व तिनें राजास त्याचें जें वर्णन करून सांगितलें, तें सुमारें १०-१२ ओळींत लिहा. (ii) राजगृही, कुंडलपुर व पावापुरी— ह्याची तुम्हांस जी कांहीं माहिती असेल, ती ५-५ ओळींत लिहा. (iii) कोणत्याही ५ महासतींचीं नांवें आणि ११ व्या, १५ व्या व २१ व्या देवांचीं लांछनें लिहा.

७. वाक्यें पूर्ण करा. ८

(i) कर्मींत......दहा भाषा अवश्य शिकाव्या, ........शौक (नाद) हल्लीं पुष्कळशा लोकांना असतो. (ii) प्रत्येक धर्मांचें ......समजून घेतलें पाहिजे, असे......सध्यां वऱ्याचशा लोकांचे होत आहेत. ह्यामुळें एकाद्यास जैन धर्मांचें रहस्य समजण्याची इच्छा झाल्यास आपण त्यांना तें........समजाविलेंच पाहिजे (हें आपलें कर्तव्यच आहे). (iii) ...... चंचल मनाचे पण सिनेमाच्या थिएटरांत ........ आपण कसे (म्हटलें जाऊं)? (iv) प्रभु श्रीमहावीर देवांचे मिथिलेंत......, वैशालींत........ आणि श्रावस्तींत.......चतुर्मास झाले होते.

८. श्री वीर चरित्रांतून तुम्हांस विशेष आवडलेलीं कोणतीही दोन गूढ रहस्यें लिहा. ५

